विभाग पहिला

# मराठी साहित्य

लेखकः—मोरेश्वर सखाराम मोने
( अध्यापिकाशाला, हिंगणें, पुणें )

सन १९३४

किंमत दहा आणे

मंत होळकर सरकार ग्रंथमाला, पुस्तक २९ वें

# राठी साहित्य व व्याकरण



## विभाग १ व २



लेखकः—मोरेश्वर सखाराम मोने

( अध्यापिकाशाला, हिंगणें, पुणें )

सन १९३४

किंमत एक रुपया

# प्रस्तावना

" दुसरें कांहीं शिकला नाहींस तरी व्याकरण शीक, कारण तें शिकला नाहींस तर 'स्व-जनां'ना तूं 'श्व-जन' (कुत्रे) करून टाकण्यासारखा मूर्खपणा तुझ्या हातून होईल " अशा अर्थाचें संस्कृतामध्यें एक सुभाषित आहे. त्यांतील अतिशयोक्ति अर्थात् सोडली पाहिजे; व व्याकरणाला फाजील महत्त्व देण्याचा शिक्षकलोकांना जो मोह होतो तोहि आवरला पाहिजे. परंतु कांहीं म्हटलें तरी व्याकरणाकडे अलीकडे जे बरेचसें दुर्लक्ष होत आहे ती गोष्ट विशेष स्पृहणीय नाहीं असे माझें मत आहे. व्याकरणाविषयीं अप्रीति उत्पन्न झालेली आहे ती व्याकरणविषयाच्या दोषामुळे नव्हे, तर विशेषेंकरून तो विषय शिकविण्याच्या सदोष पद्धतीमुळें व थोडीबहुत त्या विषयावरील रूक्ष भासणाऱ्या पुस्तकांमुळें झालेली आहे.

माझे मित्र रा० मो० स० मोने यांनीं या दोन गोष्टी मनांत बाळगून, शिक्षकांना व विद्यार्थ्यांना अगदीं हौशीनें नाहीं तरी कंटाळा न येतां वाचावेंसें वाटेल व याहून अधिक म्हणजे त्यांतील प्रश्नाविषयीं विचार करावासा वाटेल अशा तऱ्हेनें हें पुस्तक लिहिले आहे. रा० मोने यांना व्याकरणविषयाचा चांगला नाद आहे हें त्यांनीं लिहिलेल्या " **मराठी भाषेचे व्याकरणकार** " या पुस्तकावरून आणि प्राथमिक शाळांतून व हायस्कुलांतून त्यांच्या चालू असलेल्या " **आपलें बोलणें** " इत्यादि पांच-सहा व्याकरण-पुस्तकांवरून दिसून येतें.

हें पुस्तक इंग्रजी सहावी, मॅट्रिक व ट्रेनिंग संस्थांमधील विद्यार्थी यांकरितां अभ्यास-पुस्तक म्हणून नेमलें जावें या हेतूनें लिहिलें आहे; आणि त्यांत व्याकरण, छन्दःशास्त्र, अलंकार, काव्यचर्चा, व्युत्पत्ति व मराठी भाषेची परिणति, इतक्या साहित्यांगांचें त्रोटक विवेचन केलें आहे. सरकारनें नेमलेल्या ग्रॅमर कमिटीनें प्राथमिक शाळांतील व्हर्नाक्युलर फायनलच्या विद्यार्थ्यांकरितां जो व्याकरणाचा विषय ठरविलेला आहे, त्यापेक्षां थोडी तरी ज्यास्त लायकी मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांची व ट्रेनिंग संस्थांमधून बाहेर पडणाऱ्या भावी शिक्षक-विद्यार्थ्यांची असली पाहिजे, हें कोणासही मान्य होईल. अशा विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां सध्याचा मॅट्रिकचा अभ्यासक्रम व ट्रेनिंगच्या विद्यार्थ्यांचा अभ्यासक्रम डोळ्यांपुढें ठेवूनच पुस्तकाची सुटसुटीत व बांधेसूद रचना त्यांनीं केलेली आहे.

यापूर्वी रामभाऊ जोशी यांचें " प्रौढबोध व्याकरण " हें एक पुस्तक कित्येक वर्षेपर्यंत या विद्यार्थ्यांकरितां चालू होतें; व अलीकडे प्रो० केळकर यांचेंहि एक

व्याकरण प्रसिद्ध झालें आहे. 'प्रौढबोधां'त फक्त मराठी व्याकरणाचाच तेवढा विचार केलेला आहे. त्याऐवजीं आतां भाषाशास्त्राच्या अनेकांगी व महत्त्वाच्या आणि रसग्रहणास आवश्यक अशा गोष्टींचा समावेश असलेल्या पुस्तकांची सध्यां फार जरूरी होती, ती या पुस्तकानें भरून निघेल असा प्रयत्न रा० मोने यांनीं केला आहे.

शास्त्रीय मराठी व्याकरण, दादोबांचें व्याकरण, कृष्णशास्त्री गोडबोले यांचें व्याकरण, मराठी भाषा उद्गम व विकास, मराठीची सजावट, अलंकारशास्त्रावरील अनेक ग्रंथ व छन्दोरचना वगैरे ग्रंथ, या पुस्तकांत आलेल्या विषयांसंबंधीं उद्घाटन करणारे आहेत; परंतु ते सर्व मॅट्रिकच्या व ट्रेनिंगच्या विद्यार्थ्यांच्या मानानें वरच्या दर्ज्याचे व भारी किंमतीचे आहेत. ह्या पुस्तकांत फक्त ह्या विद्यार्थ्यांना आवश्यक तेवढाच भाग सुबोध रीतीनें मांडलेला असून, या ३०० पानांच्या पुस्तकाची किंमत अवघी १ रु० इतकी अल्प ठेविली आहे.

या पुस्तकाचे **साहित्य-विभाग** व **व्याकरण-विभाग** असे दोन भाग केले आहेत. हल्लीं प्रिं० ना० म० पटवर्धन, चित्रशाळा, ढवळे, मॅकमिलन, इत्यादिकांनीं प्रसिद्ध केलेलीं निरनिराळ्या लेखकांच्या वाङ्मयांतील उताऱ्यांचीं वाचन-पुस्तकें हायस्कुलांतून व ट्रेनिंग संस्थांतून अध्ययनाकरितां लाविलीं जातात. त्या पुस्तकांतील सुप्रसिद्ध लेखकांच्या व कवींच्या भाषेमधील वैशिष्ट्य व रसग्रहणाच्या दृष्टीनें आवश्यक अशा गोष्टी, तसेंच प्रत्येक काल-विभागांत मराठीचीं आढळून येणारीं स्थित्यन्तरें, '**मराठी भाषेचा इतिहास**' ह्या प्रकरणांत स्पष्ट दिग्दर्शित होतील, अशा रीतीनें मांडलीं आहेत.

'**काव्यविचार**' या प्रकरणांत काव्यगुण, काव्यांतील रस, प्रमुख अलंकार, भाषा-कला-विलासाचीं सुभाषित, कोटि, विनोद, म्हणी, इ० अंगें व कांहीं काव्यदोष यांचें उदाहरणांसहित स्थूल दृष्टीनें विवेचन केलें आहे.

'**छन्दःशास्त्र**' या प्रकरणांत जुन्या कवींच्या कवितांचीं **श्लोक-वृत्तें** व आधुनिक कवींनीं गाऊन प्रसृत केलेलीं **जाति-वृत्तें**, यांचीं लक्षणें व उदाहरणें यांसहित सुबोध माहिती दिली आहे. हल्लींच्या क्रमिक पुस्तकांतून आधुनिक कवींचीं सुंदर पद्यें ग्रथित केलेलीं असतात; आणि मुलें तीं आवडीनें गुणगुणत असतात; अर्थात् त्या पद्यांच्या रचनेची छन्दःशास्त्रदृष्ट्या माहिती जुन्या श्लोकात्मक वृत्तांच्या रचनेप्रमाणें व प्रौढ विद्यार्थ्यांस अत्यन्त आवश्यक आहे, ही गोष्ट ओघानेंच उत्पन्न होणार; म्हणून त्या माहितीचा समावेश इतर कोणीं अद्यापपर्यंत केला नाहीं

अशा सुबोध स्वरूपांत ( छन्दोरचना ह्या पुस्तकाच्या आधारें ) या पुस्तकांत रा० मोने यांनीं केला आहे.

**व्युत्पत्ति-प्रकरणां**त मराठी शब्द-घटनेचें स्वरूप थोडक्यांत दिलें असून वर्णभेद, वर्णवृद्धि, वर्णलोप, वर्णविपर्यय आणि लक्षणा किंवा रूढि इत्यादिकांच्या योगानें अर्थान्तर पावणाऱ्या कांहीं मनोरंजक व निवडक शब्दांची व्युत्पत्ति दिली आहे.

**व्याकरण-विभागा**मध्यें आतांपर्यंत मराठी व्याकरण-विषयासंबंधीं चर्चा होऊन जीं मतें निश्चित ठरलीं त्यांचा ( विशेषतः दामले यांच्या व्याकरणाच्या आधारें ) रा० मोने यांनीं समावेश केलेला आहे. तथापि सरकारनें नेमिलेल्या ग्रॅमर कमिटीनें प्राथमिक शाळांकरितां व्याकरणाचा जो अभ्यासक्रम ठरविलेला आहे, त्यास विसंगत होणार नाहीं, अशा प्रकारें विवेचन करण्याचें धोरण ठेविल्यामुळें, कांहीं ठिकाणीं कोणाचा मतभेद झाल्यास त्यास त्यांचा उपाय नाहीं. प्रमुख समास, संधि, विभक्ति, कारकें, संयुक्त क्रियापदें, प्रयोग, इ० गोष्टींबद्दल थोडक्यांत त्या त्या प्रकरणांत जी चर्चा केली आहे, ती ट्रेनिंगच्या विद्यार्थ्यांस स्मरणांत ठेवण्यास व त्यांस शिकविणाऱ्या विद्वान् अध्यापकांस वर्गांत अधिक मार्मिक विवेचन करण्यास उपयुक्त होईल अशी आहे. **वाक्य-पृथक्करणा**संबंधीं यथोचित विवेचन केलें असून, शाळाखात्यानें ठराव करून वाक्य-पृथक्करणाचा जो आराखडा मान्य केला आहे, तोच सुटसुटीत असल्यानें त्यांनीं स्वीकारिलेला आहे. यांशिवाय **पद्य-विशेष, विराम-चिन्हें,** व **लेखन-शुद्धि** यांचाही या विभागांत समावेश केला आहे.

तात्पर्य, हें पुस्तक शालोपयोगीच नव्हे, तर सामान्य जिज्ञासु वाचकांसहि उपयुक्त होईल असें झालें आहे. रा० मोने हे आज १५।२० वर्षें शिक्षकाचें काम करीत असल्यामुळें शिक्षकांच्या व विद्यार्थ्यांच्या काय अडचणी असतात हेंहि त्यांना ठाऊक झालें आहे. अशा हौशी व अनुभवी शिक्षकाच्या हातून लिहिलें गेलेलें हें व्याकरणविषयक पुस्तक चांगलें होण्याचा पुष्कळ संभव आहे अशी जी लोकांची अपेक्षा स्वाभाविकपणें असणार ती सफल होईल असें मी आश्वासन देऊं शकतों. रा० मोने यांनीं मराठी ग्रंथांत अशा चांगल्या पुस्तकाची भर घातल्याबद्दल यांचें अभिनंदन करणें जरूर आहे.

श्री० ना० दा० ठाकरसी कॉलेज,
एरंडवणें, पुणें. ता० १९।१२।३४

वा० म० जोशी.

# अ भि प्रा य

माझे मित्र रा० मो० स० मोने यांनीं नुकतेंच लिहिलेलें " **मराठी साहित्य व व्याकरण** " हें पुस्तक छापत असतांनाच त्यांनीं मला वेळोवेळीं दाखविलें. त्यांतील बहुतेक प्रकरणें मीं वाचलीं आहेत; व त्यांवरून मला अशी निश्चिति वाटते कीं, हें पुस्तक कर्त्याच्या अपेक्षेप्रमाणें इंग्रजी हायस्कूलमधील व मराठी ट्रेनिंग कॉलेजांतील विद्यार्थ्यांस उपयुक्त होईल; व त्यांच्या भाषाशास्त्राच्या अध्ययनासंबंधाच्या सर्व गरजा ह्या पुस्तकानें भागतील.

परीक्षेंत उत्तीर्ण होण्याची भाडोत्री दृष्टि बाजूस ठेवून व ज्ञानाकरितां ज्ञानार्जन ह्या दृष्टीनें पाहूं जातां, 'मराठी भाषेचा इतिहास' हें प्रकरण विशेष उपयुक्त आहे. यांत अंगे दोन. (१) मराठी भाषेच्या परिणतेची संकलित माहिती,—अर्थात् संस्कृत व प्राकृत भाषा यांचे द्वारा तिचें जनन व क्रमविकास यांबद्दल साधार विवेचन;—आणि (२) मराठी भाषेच्या अत्यन्त जुन्या रूपांपासून तों वर्तमानकालीन नव्या रूपांपर्यंत सर्वच रूपें धारण करणाऱ्या अनेक निवडक उताऱ्यांचा संग्रह. पैकीं पहिल्या अंगाबद्दल रा० कृ० पां० कुळकर्णीच—ज्यांच्या पुस्तकावरून ग्रंथकारानें ही माहिती घेतली आहे ते—अभिनंदनास विशेषतः पात्र असले, तरी दुसरें अंग जे उतारे, ते रा० मोने यांनींच विद्यार्थ्यांस उपयुक्त असे सपरिश्रम शोधून व निवडून ग्रथित केले असल्यानें त्यांबद्दल तेच अभिनंदनार्ह ठरतात. हे उतारे एकामागून एक वाचतांना वाटतें कीं, आपल्यापुढें जुन्या ज्ञानेश्वर–कालापासून तों वर्तमान केळकर–काळापर्यंतचा मराठी भाषेच्या स्थित्यन्तराचा चित्रपटच उलगडत आहे. त्यांत सांठलेल्या विविध व मनोरंजक ज्ञानानें व भाषेच्या रूपवैचित्र्यानें मनाची चांगलीच उदात्त करमणूक होते; म्हणून सामान्य वाचकांसही मी असें सप्रशंस सुचवितों कीं, त्यांनीं इतर प्रकरणें न वाचिलीं तरी ' मराठी भाषेचा इतिहास ' हें प्रकरण अवश्य वाचावें. या वाचनापासून त्यांना ज्ञान व मनोरंजन हीं दोन्हीं लाभतील.

इतर साहित्यांगांच्या दृष्टीनें पाहतांही लेखकानें हें पुस्तक आजच्या कालापर्यंत आणून ठेविलें आहे, हें त्यांतील छन्दः–शास्त्र या प्रकरणावरून उघड दिसून येतें. प्रो० मा० त्रिं० पटवर्धन यांनीं जुन्या व नव्या वृत्तांचा संग्रह ‘ छन्दोरचना ’ या स्वतंत्र पुस्तकांत केला आहे; पण त्यांतील विविध उपयुक्त ज्ञान--विशेषतः नव्या चालींच्या वृत्तांविषयीं माहिती–विद्यार्थ्यांच्या आटोक्यांत सुलभपणें आणून देण्याचें काम रा० मोने यांनींच केलें आहे, अर्थात् त्याबद्दलचें श्रेय त्यांसच आहे. शिवाय या ग्रंथांतील निरनिराळ्या प्रकरणांच्या उत्कृष्टत्वाबद्दल प्रस्तावक रा० वामनराव जोशी यांशीं मी पूर्ण सहमत आहें; म्हणून त्यांच्यापेक्षां कांहीं अधिक लिहिण्याचें मला प्रयोजन दिसत नाहीं.

रा० मोने यांच्यासंबंधानें सांगणें म्हणजे त्यांचें मराठी भाषेचें—विशेषतः त्यांतील व्याकरण-शास्त्राचें—अध्ययन विस्तृत, दीर्घकालीन व मार्मिक असें आहे. आज वीस वर्षे ते मराठीच्या अध्यापकाचें काम हिंगणें येथील हायस्कुलांत व ट्रेनिंग कॉलेजांत करीत आहेत. अध्यापनाचे बाबतींत त्यांनीं चांगला लौकिक संपादन केला आहे. **‘मराठी भाषेचे व्याकरणकार’** या त्यांनीं लिहिलेल्या पुस्तकावरून त्यांची शोधक व व्यासंगी बुद्धि चांगलीच निदर्शनास येते. अशा रीतीनें मराठी भाषेचा दीर्घकालीन व्यासंग, अध्यापनाचा अनुभव, व आपलें म्हणणें थोडक्यांत व टापटिपीनें मांडण्याची ग्रंथलेखनामुळें आलेली हातोटी, इ० ग्रंथकाराच्या गुणांमुळें प्रस्तुत ग्रंथ चांगला उतरला आहे हें निराळें सांगण्याचें कारणच नाहीं. अभ्यासु लोकांकडून प्रस्तुत पुस्तकाचा योग्य आदर केला जाईल असा मला भरंवसा आहे.

न्यू इंग्लिश स्कूल, पुणें
ता० २८।१२।३८

**गो० कृ० मोडक**

# भूमिका

" सध्यांच्या देशस्थितींत पुस्तकें लिहिणारांनीं शुद्ध भाषाविषयक वादांत आपली हिंमत खर्चावी किंवा नाहीं ? शेंकडा नव्याण्णव लोकांस ज्याची पर्वा नाहीं किंवा गरज नाहीं, अशा व्याकरणासारख्या एकदेशीय विषयांत काळ घालविणें कितपत फायदेशीर आहे ? यास उत्तर असें कीं, एक तर मराठी भाषेस उत्तरोत्तर उन्नतावस्था येत जाणार आहे, अशी खातरी असल्यामुळें या कामास मीं हात घातला " असें कै० **आगरकर** यांनीं आपल्या '**वाक्य-मीमांसे**'त म्हटलें आहे; आणि त्याच कारणास्तव मींही हें पुस्तक लिहिण्यास हात घातला. शिवाय, एकाद्या गोष्टीचा नाद किंवा वेड म्हटलें तरी चालेल; हेंही हें पुस्तक लिहिण्याचें माझें दुसरें कारण आहे. तिसरें कारण असें कीं, 'मराठी' हा विषय आणि व्याकरण व तदन्तर्गत अलंकार, व्युत्पत्ति, छन्दःशास्त्र, काव्यचर्चा, इ० गोष्टींकडे विद्यार्थ्यांचें किंवा विद्यापीठांचें सध्यां फारसें लक्ष नाहीं ही गोष्ट खरी असली, तरी विद्यापीठांतील 'मराठी' विषयाचे विद्वान् सभासद व ट्रेनिंग कॉलेजाचे चालक यांस त्यासंबंधानें कांहीं आस्था नाहीं असें नसून, त्यांनाही '**मराठी**'चा विशेष पुरस्कार करण्यांत कांहीं अडचणी असाव्या, हेंच अधिक संभाव्य आहे. अर्थात् योग्य काल आल्यानंतर—आणि आगरकरांच्या वरील भाकिताप्रमाणें तो येणार हें खचित—या विषयाचें अधिक आस्थापूर्वक अध्ययन विद्यार्थ्यांकडून व्हावें, अशी योजना विद्यापीठांकडून व ट्रेनिंग संस्थाकडून होईल, यांत कांहीं शंका नाहीं. अशा वेळीं मराठीच्या अभ्यासकांस जशा प्रकारचीं पुस्तकें [असा]वीं, तशा प्रकारचें हें पुस्तक मराठीची आस्था बाळगणाऱ्यांपुढें मी ठेवीत आहें.

हें पुस्तक प्रथम दोन वेळां प्रि० **महादेव काशीनाथ कारखानीस** (ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन, धुळें) यांनीं वाचून पाहिलें. तसेंच माझे आप्त व न्यू [इं]ग्लिश स्कूलमधील विद्वान् शिक्षक श्री० **गोविंद कृष्ण मोडक** यांनींही पुस्तक [छ]पत असतां आपुलकीचे भावानें बराचसा भाग वाचून पाहिला. या उभयतांनींही [ज्]या अमूल्य सूचना केल्या, त्यांबद्दल त्यांचे मीं प्रथम आभार मानितों. तथापि पुस्तक [सु]टसुटीत व्हावें म्हणून अनेक ठिकाणचीं निवडलेलीं अनेक उदाहरणें कमी करून

तें हल्लींच्या स्वरूपांत दिसत आहे इतकें आटोपसर करीत असतांना, माझ्या हात
कांहीं न्यूनाधिक झालें असल्यास त्याचा जबाबदार मीच आहें.

या पुस्तकांतील विशेषांसंबंधानें प्रस्तावनाकार प्रो० **वा० म० जोश**
यांनीं जें कांहीं लिहिलें आहे त्यापेक्षां मला कांहीं ज्यास्त सांगावयाचें ना
या पुस्तकाच्या लेखनाच्या कामीं मला शेकडों पुस्तकें वाचावीं, चाळा
अभ्यासावीं लागलीं; तीन वर्षें सक्त परिश्रम झाले; पुढें ज्यांनीं आपल्याक
पुस्तकाची माझ्याकडे मागणी केली त्यांच्या अभिवचनांतच एक वर्ष खर्ची प
अखेर मराठीचा युनिव्हर्सिटींत व इतरत्र कोणी वाली नाहीं या सबबीवर तें 
करण्यांत आलें; हें सर्व समजून उमजून चित्रशाळेच्या चालकांनीं तें छापावय
घेतलें, ही गोष्ट त्यांनीं विशेष केली यांत कांहीं शंका नाहीं; म्हणून त्यांचे ये
आभार मानणें अवश्य आहे.

हें पुस्तक लिहीत असतां '**छन्दोरचना**' व '**मराठी भाषा उद्ग
व विकास**' ह्या पुस्तकांचा मला बराच उपयोग झाला. माझ्या पुस्तकां
जाति-वृत्तांसंबंधाचा भाग तर मीं पहिल्या पुस्तकाच्या आधारेंच लिहिला 
यास्तव व आपल्या पुस्तकाचा उपयोग करण्यास परवानगी दिल्याबद्दल मी
मित्र प्रो० **माधव त्रिंबक पटवर्धन** ( राजाराम कॉलेज, कोल्हापूर ) 
फार आभारी आहें. त्याचप्रमाणें दुसऱ्या पुस्तकाचे लेखक व माझे दुसरे
श्री० **कृष्णाजी पांडुरंग कुळकर्णी** यांचाही मी आभारी आहें.

आमच्या संस्थेंतील आमचे प्रोत्साहक प्रो० **वा० म० जोशी** यांनीं मा
प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल व माझे सहकारी श्री० **वि० आ० मोडक** य
अनेक प्रकारें साह्य केल्याबद्दल त्यांचे मी मनःपूर्वक आभार मानितों.

मराठी ग्रंथोत्तेजक मंडळ, इंदोर, या संस्थेनें माझ्या ' मराठी भाषेचे व्याकर
कार ' या पुस्तकास आपल्या मालेंत समाविष्ट करून घेऊन पूर्वी दोनशें रु
उत्तेजनादाखल दिले होते; होळकर सरकारकडून काटकसरीच्या धोरणामु
सदरहू संस्थेस मिळणारी मदत आतां बंद झाली आहे. अर्थात् त्या संस्थेला पूर्वी
प्रमाणें लेखकांस उत्तेजन देतां येणें अशक्य आहे; तरीही त्या संस्थेच्या परीक्षक
मंडळानें माझें हें पुस्तक पाहून त्यास आपल्या मालेंत समाविष्ट करण्याची पर
नगी दिली आहे, याबद्दल मी त्या मंडळाचे कृतज्ञता-बुद्धीनें आभार मानितों.

'अध्यापिका-शाला,"
हिंगणें, पुणें. ता० २०।१२।३४

आपला नम्र,
**मोरेश्वर सखाराम मो**

# शुद्धिपत्र.

## साहित्य-विभाग

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४८ | २ | विष्णुशात्रा | विष्णुशात्री |
| ७८ | २२ | पाणी चाले तैं | (तैं) हें अक्षर नको. |
| ,, | २३ | ५व्या | ४ थ्या |
| ८७ | २ | विंवा | किंवा |

## व्याकरण-विभाग

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५५ | १ | –शिब्दवचार | शब्द–विचार |
| ९५ | ११ | गृह व गृहस्थित | गृहस्थ व गृहस्थित |

———

# अनुक्रमणिका

## विभाग पहिला

## मराठी साहित्य व व्याकरण

# विभाग पहिला

# मराठी साहित्य

## मराठी भाषेचा इतिहास

### उत्पत्ति

मराठी भाषेच्या उत्पत्तीसंबंधानें विद्वानांत एकमत नाहीं; संस्कृत भाषेपासून **मागधी**, **पैशाची**, **शौरसेनी** व **माहाराष्ट्री** या प्राकृत भाषा झाल्या आणि त्यांपैकीं माहाराष्ट्री नांवाच्या प्राकृत भाषेपासून मराठीची उत्पत्ति झाली. म्हणजे मराठीची माहाराष्ट्री प्राकृत ही आई व संस्कृत ही आजी, असें कांहींचें म्हणणें आहे. वर्णलोप, वर्णवृद्धि, वर्णविपर्यय, इ० फरकांनीं संस्कृतापासून प्राकृत ( माहाराष्ट्री ) आणि प्राकृतापासून मराठी, अशी ढोबळ व सरळ उत्पत्ति ते प्रतिपादितात, कार्य–कज्ज–काज, सर्प–सप्प–साप, अरघट्ट–रहट्ट–रहाट, घोटक–घोडअ–घोडा, अंगार–इंगालो–इंगळा, हृदयं–हिअअ–हिय्या, याप्रमाणें.

दुसऱ्या पक्षाचें म्हणणें असें कीं, मराठी भाषा कोणत्याही एका प्राकृतापासून निघाली नसून, सर्व प्राकृत भाषांतील शब्द तिनें घेतले आहेत. त्यांतल्या त्यांत माहाराष्ट्री आणि अपभ्रंश ह्या दोन भाषांचे अवशेष मराठींत पुष्कळ सांपडतात; (म० भा० उ० वि० पृष्ठ १५१). संस्कृत भाषा जेव्हां प्रचारांत होती तेव्हांपासून किंवा त्यापूर्वीही वैदिक कालापासून प्राकृत भाषा बोलभाषा म्हणून ह्या देशांत सामान्य लोकांच्या प्रचारांत होत्या; परंतु संस्कृत भाषा बोलणाऱ्या आर्य लोकांची संस्कृति ह्या लोकांपेक्षां श्रेष्ठ दर्जाची असल्यामुळें, संस्कृत भाषेचा पगडा ह्या प्राकृत भाषांवर ज्यास्त बसला; आणि पुढें पुढें " राजा व पंडित इ० श्रेष्ठ संस्कृतीचे लोक संस्कृत भाषा, त्यांच्यापेक्षां कमी संस्कृतीचे लोक प्राकृत भाषा व राजाचे सेवक, सुतार, लोहार, तेली, तांबोळी, इ० कारागीर लोक अपभ्रंश भाषा वापरूं लागले; ( म० भा० पृ० ११३ ). असा प्रकार एकाच वेळीं आढळून येतो.

मागधी, पैशाची, शौरसेनी व माहाराष्ट्री ह्यांपैकीं मगध म्हणजे बहार प्रांत व त्याच्या लगतचा प्रदेश यांत **मागधी** भाषा चालू होती; शूरसेन राजाचा प्रांत मथुरा व त्याच्या आसपासचा प्रदेश यांत **शौरसेनी** भाषा चालू होती; पंजाब व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत **पैशाची** भाषा चालू होती; महाराष्ट्र ह्या नांवाचा एक देश नसून ( महा + राष्ट्र ) म्हणजे मोठा देश ह्या अर्थानें तें नांव प्रचारांत आलें; व अशा बऱ्याच मोठ्या प्रदेशांत चालू असलेली भाषा ती **माहाराष्ट्री** असें म्हणूं लागले. माहाराष्ट्री भाषा उज्जनीपासून दक्षिणेकडे गोदावरीपर्यंतच्या विस्तृत प्रदेशांत चालू होती असें मानिल्यास, त्या प्रदेशाला त्या कालीं महाराष्ट्र असें म्हटल्याचा पुरावा कोठेंही नाहीं. आज ज्या प्रदेशाला आपण महाराष्ट्र असें म्हणतों, त्या गोदावरीच्या दक्षिणेकडील भागास पूर्वी दण्डकारण्य, दक्षिणापथ, अशीं नांवें होतीं. ह्यावरून माहाराष्ट्री हें प्राकृत भाषेचें नांव प्रांतावरून पडलेलें नसून, इतर प्राकृत भाषांनीं व्यापिलेल्या प्रदेशाशिवाय बाकी उरलेल्या मोठ्या प्रदेशांत जी भाषा चालू होती, तिला माहाराष्ट्री असें म्हणण्यांत आलें. इतर प्राकृत भाषांपेक्षां वाङ्मय–निर्मितीही तिच्यांत अधिक झाली.

संस्कृताचा प्रचार राजे व पंडित यांत चालू असतांच त्यांच्यापेक्षां कमी संस्कृतीच्या लोकांत प्राकृत भाषा चालू होत्या; व त्यांच्यापेक्षांही खालच्या वर्गांत संस्कृत व प्राकृत यांमध्यें फरक होऊन बनलेल्या **अपभ्रंश** भाषा वैदिक व पाणिनीय कालांतही चालू होत्या. ह्या सर्व भाषा वस्तुतः पृथक् पृथक् आहेत. संस्कृत भाषा निराळी, प्राकृत भाषा निराळ्या, आणि ह्या दोहोंपासून बनलेल्या अपभ्रंश भाषा निराळ्या.

मराठीनें ह्या सर्वांचें ऋण घेतलेलें आहे. संस्कृत तत्सम शब्द मराठींत फार आहेत आणि जरूर तर आणखी हवे तेवढे घालण्याचा प्रचार आजच्या प्रौढ मराठींत मुळींच कमी झालेला नाहीं. तद्भव शब्दही जवळ जवळ संस्कृताइतकेच सांपडतील. प्राकृतोत्पन्न आणि अपभ्रंश हेही शब्द जवळ जवळ तितकेच आढळतात; माहाराष्ट्री प्राकृतांतीलच तेवढे शब्द मराठींत आले आहेत असें नाहीं, इतर प्राकृतांतीलही शब्द मराठींत आहेतच; माहाराष्ट्रींतून आलेले ज्यास्त आहेत इतकेंच. तेव्हा मराठी भाषा ही केवळ संस्कृतापासूनच उत्पन्न झाली, किंवा माहाराष्ट्रीपासूनच निर्माण झाली असें कांहींच म्हणतां येत नाहीं; तर संस्कृत–माहाराष्ट्री-

अपभ्रंश ह्या सर्वांच्या मिश्रणानें मराठीची उत्पत्ति झाली, अशी कांहीं विद्वानांची विचारसरणी आहे.

आजच्या मराठींत मुसलमानी राजवटीमुळें पुष्कळच आरबी व फारसी शब्द घुसून ते मराठीशीं जवळ जवळ एकरूप झालेले आहेत; पण एवढ्यावरून त्या भाषांपासून मराठी उत्पन्न झाली असें कांहीं होत नाहीं. त्याचप्रमाणें इंग्रजी, पोर्तुगेज, इ० पाश्चात्य भाषा; व कानडी, तेलगू, इ० द्राविडी भाषा; आणि हिंदी, गुजराती, इ० आज देशांत चालू असलेल्या भाषा; ह्यांचाही मराठीवर कांहीं अंशीं परिणाम घडलेला आहे खरा, परंतु तेवढ्यावरून मराठीचें जनकत्व त्या भाषांकडे जाऊं शकत नाहीं, हें स्पष्टच आहे. भाषासमृद्धीच्या दृष्टीनें त्या सर्वांचें कमीजास्त उपकारित्व मात्र मराठीनें कबूल केलें पाहिजे.

कोणत्याही एका भाषेलाच मराठीची जननी असें न म्हटलें, तरी मागधी, पैशाची, शौरसेनी व माहाराष्ट्री, ह्या चार मुख्य प्राकृत भाषा निरनिराळ्या प्रांतांत उदयास आल्या व संस्कृत चालू असतांही कित्येक वर्षे त्या नांदतच होत्या आणि त्या प्राकृत भाषांपासूनच सध्यांच्या देशभाषा झाल्या, असें एकंदरींत म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. म्हणजे सर्व उत्तर-हिंदुस्थान हा आर्यांच्या तत्कालीन वसाहतींचा एक विस्तृत प्रांत मानिला, आणि त्याचे प्राच्य, प्रतीच्य, उदीच्य, मध्य व दाक्षिणात्य असे भाग मानिले, तर प्राच्य म्हणजे पूर्वेकडील मगध व त्यालगतच्या प्रदेशांत मागधी ही प्राकृत भाषा चालू असून, तिच्यापासूनच आतांच्या बहारी, बंगाली, उरिया, ह्या भाषा बनल्या आहेत; मध्यदेशांत शौरसेनी प्राकृत चालू होती व तिच्यापासूनच हल्लींची हिंदी भाषा निघालेली आहे व ती मुख्यतः संयुक्त प्रांतांत चालू आहे; प्रतीच्य म्हणजे पश्चिमभागांत अशोकाच्या शिलालेखांतील प्राकृत भाषा होती व तिच्यापासून हल्लींच्या काठेवाडी, राजस्तानी व गुजराती, ह्या भाषा निघाल्या आहेत; व त्या त्या प्रांतांतून चालू आहेत; तसेंच उदीच्य म्हणजे उत्तर–भागांत पैशाची ही प्राकृत भाषा चालू होती व तिच्यापासून लहांडी, पंजाबी, ह्या आतांच्या भाषा निघाल्या आहेत; दक्षिणेकडील मोठ्या प्रदेशांत म्हणजे महा-राष्ट्रांत 'माहाराष्ट्री' नांवाची प्राकृत भाषा चालू होती व तिच्या पुष्कळ अंशापासून हल्लींच्या मराठीची उत्पत्ति झाली आहे. माहाराष्ट्री भाषा बोलणारे आर्य लोक गोदावरीच्या दक्षिण-भागीं तुंगभद्रेपर्यंत पसरून स्थायिक झाल्यानंतर त्या प्रदेशाला महाराष्ट्र हें नांव प्राप्त झालें; आणि त्यांतील लोकांची हल्लींची भाषा ती **मराठी भाषा** होय.

वरच्या विवेचनाची स्पष्टता खालील मांडणीवरून होईल—




[ मराठी भाषा, उत्पत्ति व विकास पृ० १२४ वरून किंचित् फरकानें.

# आरंभ-काल

येथपर्यंत कोणत्या भाषांपासून मराठीची उत्पत्ति झाली, यासंबंधाचें विवेचन झालें. आतां कोणत्या कालापासून मराठीचा आरंभ झाला त्याचा विचार करूं.

कोणतीही भाषा अगोदर बोलण्यांत व नंतर लेखनांत येत असते. तेव्हां लेखी पुरावा जेथपर्यंतचा सांपडतो, तो मराठीचा आरंभकाल समजण्यास हरकत नाहीं. लेखी पुरावा म्हणजे ग्रंथ, शिलालेख, ताम्रपट वगैरे. पैकीं मराठीचा आरंभकाल ठरविण्यास उपयुक्त असे खालील शिलालेख सांपडले आहेत—

( १ ) सन ९८३ तला म्हैसूरजवळील श्रवणबेळगोळ येथील गोमतेश्वराच्या पुतळ्याच्या खालील शिलालेख. यांत "श्रीचावुण्डराजें करवियलें" व "गंगरायें सुत्तालें करवियलें" अशा दोन मराठी ओळी आहेत.

( २ ) ११ व्या शतकाच्या उत्तरार्धांतील 'राजीमतीप्रबोध' नामक एका ग्रंथांत एका महाराष्ट्रिक स्त्रीचें वर्णन आहे. त्यांत "मी काई सांघओ, गोमटी मुह" इ० मराठी वळणाचीं वाक्यें आहेत.

( ३ ) त्यानंतर सन ११२९ तील मानसोल्लास नामक ग्रंथांत "**जेणे** रसातल उणु मत्स्यरुपें वेद **आणियले** मनु शिवक **वाणियले** तो संसार सायर तारण मोहंतो **रावो नारायणु** जो गीची" ह्या ओळी आहेत. त्यांतील मराठी ठशाचीं रूपें स्पष्ट कळण्यासारखींच आहेत.

( ४ ) सन ११८७ तला परळचा शिलालेख. यांत "अथ तु जो कोणु हुवि ए शासन लोपी तेया श्रीवैद्यनाथ देवाची भाल सकुटुंबिआ पडे" इ० शपथ सर्वांना कळण्यासाठीं मराठींत कोरलेली आहे.

( ५ ) सन १२०६ मधील भास्कराचार्यांचा नातू चांगदेव यानें चाळीसगांवाजवळ पाटणच्या भवानीच्या मंदिरांत कोरविलेला लेख मराठीच्या दृष्टीनें अधिक स्पष्ट आहे. त्यांत "इयां पाटणीं जें केणें उघटे तेहाचा असि आऊं जो राउला होता ग्राहकापासी तो मढा दिन्हला" इ० वाक्यें तत्कालीन मराठीच्या स्वरूपाचीं निदर्शक आहेत.

( ६ ) सन १२७३ मधील पंढरपूरच्या विठ्ठलाच्या मंदिरांतील 'चौऱ्यांयशींच्या शिळेवरील लेख' यांत पुढील वाक्यें आहेत—"स्वस्ती श्री सकु ११९५ श्रीमुख संवत्सरे फागनिपूर श्रीविठ्ठलदेव रायासि तिसा सिति फुलें दांडे आचंद्रार्क चालावेआ नाना भक्त मालीआं दत्त पैकाचा विवरु"

याप्रमाणें शिलालेखांचें व जुन्या आरंभींच्या मराठीचें स्वरूप ध्यानांत यावें म्हणून हे त्रोटक उतारे दिले आहेत; त्यांवरून असें दिसून येईल कीं, सन ९८३ च्या लेखापूर्वी निदान शें-दोनशें वर्षें तरी मराठी भाषा बोलण्यांत असावी; ग्रंथ-लेखन संस्कृतांतच होत होतें; विद्वानांत संस्कृतचें प्राबल्य ज्यास्त होतें; केवळ सर्वसामान्य लोकांना कळण्यासाठीं त्यांच्या चालू बोलभाषेंत कांहीं आज्ञा वगैरे कोरविल्या जात. सन ७८० पर्यंत ताम्रपट इत्यादिकांत मराठी शब्दांचीं तुरळक रूपें आढळतात.

मराठींतील पहिला उत्कृष्ट ग्रंथ **ज्ञानेश्वरी** ( शक १२१२ सन १२९० ). तिच्या पूर्वीचें बाळसें मराठींत अवलोकावयास मार्ग नाहीं. ज्ञानेश्वरीपूर्वी निदान ४।५ शें वर्षें तरी मराठी बोलभाषा म्हणून वावरत असतां तींत संस्कृताच्या वर्चस्वामुळें ग्रंथ-रचना झाली नाहीं; पण कांहीं लोक-कथा, लोक-गीतें, त्या काळांत 'सरस्वतीकंठभू' म्हणून प्रसिद्ध असलेल्या महाराष्ट्रांत व मराठींत झालींच नसतील असें नाहीं; तथापि तीं उपलब्ध मात्र नाहींत.

## मराठीचीं निरनिराळीं स्वरूपें

भाषेवर मुख्यतः राजवटींचा परिणाम होतो, असें म्हणावयास हरकत नाहीं. राजवटींमुळें राज्यक्रान्तीबरोबरच धर्मक्रान्ति, समाजक्रान्ति, विचारक्रान्ति, भाषाक्रान्ति, ह्याही गोष्टी होत असतात. आपल्या मराठीवर निरनिराळ्या राजवटींमुळें असेच परिणाम झाले असल्यानें, आपण त्या दृष्टीनें भाषेचीं निरनिराळीं स्वरूपें केव्हां कशा प्रकारचीं आढळतात, त्याचा विचार करूं.

१. यादवकालीन मराठी ( सन १२५० ते १३५० ) ज्ञानेश्वर, महानुभाव
२. बहामनीकालीन मराठी ( सन १३५० ते १६०० ) एकनाथ, दासोपंत
३. शिवकालीन मराठी ( सन १६०० ते १७०० ) रामदास, तुकाराम
४. पेशवेकालीन मराठी ( सन १७०० ते १८०० ) मोरोपंत, रामजोशी
५. इंग्रजकालीन मराठी ( सन १८०० ते चालू )
  ( क ) सन १८०० ते १८३६ डॉ० कॅरे, जाभेकर, इ०
  ( ख ) सन १८३६ ते १८५७ बापू छत्रे, दादोबा, इ०
  ( ग ) सन १८५७ ते १८७४ कृ० शा० चिपळूणकर, राजवाडे, इ०
  ( घ ) सन १८७४ ते १९०० विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक, इ०
  ( ङ ) सन १९०० ते चालू केळकर, कोल्हटकर, इ०

# प्राचीन गद्य व पद्य

## १. यादवकालीन मराठी

मराठीचा ग्रंथनिविष्ट काल इ० स० च्या १२ व्या शतकापासून सांपडतो. त्या काळीं देवगिरी येथें यादवांची कारकीर्द सुरू होती. त्या राजांनीं मराठीला अतिशय उत्तेजन दिलें. याच कालांत सन ११८८ मध्यें मुकुंदराजानें आपला ' विवेकसिंधु ' नांवाचा ग्रंथ लिहिला. मराठींतील महत्त्वाची अशी हीच पहिली वाङ्मयनिर्मिति सांपडते. त्यानंतर रामदेवराव जाधवांच्या कारकीर्दींत ' **ज्ञानदेवी** ' नांवाचा वाङ्मयमय, भक्तिप्रधान, तात्त्विक ग्रंथ, ज्ञानेश्वरांनीं लिहिला ( सन १२९० ). " यांतील मराठी भाषेचें स्वरूप पाहिलें म्हणजे एक प्रकारचें कोडेंच वाटतें. जन्मानंतर थोड्याच काळांत ही अर्भकी आपल्या प्रभावानें, सौंदर्यानें, गांभीर्यानें, प्रसादानें, भूषणानें व लालित्यानें, सर्वांस दिपविणारी अशी कशी झाली, लहानशा काळांत असलें हें प्रशान्त, प्रबुद्ध व प्रौढ स्वरूप तिला कसें प्राप्त झालें, व ह्याच्या पूर्वींचें लहानपणचें तिचें बाळसें, तिचा दूडपणा, वगैरे अजमावण्यास कांहींच साधन असूं नये, याचें कोडें उलगडत नाहीं. मराठी भाषा जी एकदम पुढें येते ती अशा दिपविणाऱ्या स्थितींत येते ( म० भा० पृ० १७९ ).

याच शतकांत ' **पंचतंत्र** ' नांवाचें संस्कृत पंचतंत्राचें मराठी भाषान्तर झालेलें उपलब्ध आहे. याच्या पूर्वींचा मराठी गद्य ग्रंथ उपलब्ध नाहीं.

याच सुमारास महानुभावीय वाङ्मयास सुरुवात झाली. महानुभावीयांचा संस्थापक श्रीचक्रधर, यानें तत्कालीन चालू असलेल्या मराठींत लोकांस उपदेश करण्यास सुरुवात केली. तो जरी मूळचा गुर्जर प्रांतांतील होता, तरी त्याचा मराठीविषयीं विशेष अभिमान दिसून येतो. " कानडदेशा, तेलंगदेशा न वचावें, महाराष्ट्रीं असावें " असा त्याचा ग्रंथलेखनासंबंधानें त्याच्या अनुयायांना दंडक होता. त्याचप्रमाणें संस्कृतांत ब्रह्मविद्येसंबंधीं ज्ञान लिहिल्यास सामान्य लोकांना त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं; म्हणून श्रीचक्रधराचे शिष्य नागदेवाचार्य यांनीं "ब्रह्मविद्येस माझिया स्वामीचा परिवारू नागवैल की, भणौनि हे केशवा, संस्कृत सूत्रबद्ध प्रकरण न करी तूं " असा आपल्या शिष्यांस उपदेश केला आहे. श्रीचक्रधरानें स्वतः कांहीं ग्रंथ लिहिलेला नाहीं; परंतु तत्पंथीय विद्वान् शिष्य

महीन्द्र व्यास ह्यानें सन १२६० च्या सुमारास म्हणजे ज्ञानेश्वरीपूर्वी सुमारें ३० वर्षें श्रीचक्रधराचें ' लीलाचरित्र ' गायिलें. त्यानंतर भास्कर व्यास ह्यांनीं ज्ञानेश्वरीपूर्वी १६-१७ वर्षें शिशुपालवध, उद्धवगीता, इ० ग्रंथ लिहिले. खुद्द चक्रधराच्या तोंडचीं त्याच्या शिष्यांनीं उतरून घेतलेलीं सिद्धान्त-सूत्रें गद्य-स्वरूपांत असून, महानुभावीयांचें गद्य व पद्य असें दोन्ही प्रकारचें वाङ्मय एव्हां-पासून सुरू झालेलें आहे. पुढें पुढें चक्रधराच्या सूत्राचे अर्थ विकृत होऊं नयेत म्हणून त्यांच्यांतील विद्वानांनीं व्याकरणें व कोश लिहिले.

आतां या कालांतील मराठी भाषेचें स्वरूप स्पष्ट कळण्यासाठीं दोन-तीन लहान अवतरणें देतों.

## मुकुंदराज ( सन ११८८ )

**विवेकसींधुची शब्दरत्नें। कंठी धरीजे प्रयत्ने।**
**तरी जनकाचेनि महीमाने। श्लाघ्यता पावे ॥ ५१ ॥**
**लवण समुद्रीचीं भुशणें मुक्तें। होती कीरू समस्ते।**
**परी भुशीतया हीसी मुक्तत्वें। विवेकसिंधुची कीं ॥५२॥**
**अहो विवेकसींधुची पूर्वार्द्ध। क्षीरसिंधुपरीस अगाध।**
**जेथें निर्गुण निजबोध। भेटे विष्णुस्वरूप ॥ ५३ ॥**
**नरुसींव्हाचा बळ्ळाळु। ह्याचा कुमर जैतपाळु।**
**तेणे करविला हा रोळु। ग्रंथरचनेचा ॥ ५५॥ ॥**

[ यांत (१) वेदान्तग्रंथ असल्यामुळें, विवेकसिंधु, श्लाघ्यता, लवणसमुद्र, क्षीर-सिंधु, निर्गुण, निजबोध, विष्णुस्वरूप, हे शुद्ध संस्कृत शब्द आहेत; (२) जैतपाळु बळ्ळाळु इ० नामांचीं प्रथमेचीं एकवचनीं ऊकारान्त रूपें आहेत; ( ३ ) कान-डीच्या संसर्गामुळें आलेला 'ळ' हा वर्ण आहे; ( ४ ) रोळु हें शुद्ध देशभाषेंतलि रूप दिसतें; ( ५ ) नरुसींव्ह, पूर्वार्द्ध, भुशणें, इ० संस्कृतचीं विकृत रूपें आहेत ( ६ ) पावे, भेटे, हीं जुन्या वर्तमानकाळाचीं रूपें आहेत व ( ७ ) धरिजे हें कर्मणि क्रियापदाचें रूप आहे. ]

## केशवराज व्यास ( १३ वें शतक )

" सर्वज्ञें भणितलें: अनंत शक्तिः परमेश्वरुः सकळांसीही निश्चयें व्यवस्था करितिः गावां हत्ती आलाः तै जात्यंध हस्तीतें पाहों गेलेः एकें पावो देखिलाः एकें

सोंड देखिली: एकें कानू देखिला: एकें पाठी देखिली: एकें पोटु देखिलें: एकें पुंस देखिलें: मग एकुमेकेंसी संवादति : हा रे तुवां हस्ती देखिला: पावो देखिला तो भणे हस्ती खांबा सारिखा: सोंड देखिली तो भणे हस्ती मुसळा सारिखा: कानु देखिला तो भणे हस्ती सुंपा सारिखा: पाठी देखिली तो भणे हस्ती भिंती सारिखा......तेयां मध्ये डोळसू असे: तो भणे: हा हस्तीचा एकेकू अवयेवू होये: पर: हस्ती नोहे: एवं अवयेवीं युक्त तो हस्ती: "

[ यांतही (१) कानू पोटू, डोळसू, एकेकू, हीं ऊ-कारान्त व पावो हें ओ-कारान्त प्रथमेचें एकवचनी अशीं रूपें आहेत; ( २ ) जात्यन्ध, निश्चयें, शक्तियुक्त, हीं शुद्ध संस्कृत शब्दांचीं रूपें आहेत; ( ३ ) कानु, हत्ती, पाठी, पोटु, पुंस, मुसळ, भिंत, गांव, पावो, सोंड, हीं तद्भव शब्दांचीं रूपें आहेत; ( ४ ) भणे, भणितलें, हीं भूतकाळीं रूपें आहेत; ( ५ ) सकळांसी, हस्तीतें, एकुमेकेंसीं, हीं द्वितीयेचीं रूपें आहेत; ( ६ ) निश्चयें, एकें, तुवां, अवयेवीं, हीं तृतीयेचीं रूपें आहेत; ( ७ ) कोथळेया, खराटेया जेयासी, तेयांमध्यें, हीं सामान्यरूपें आहेत; ( ८ ) होये, नोहे, हीं जुन्या वर्तमानकाळाचीं एकवचनी रूपें व ( ९ ) करिती, उरोधिती, हीं अनेकवचनी रूपें आहेत; ( १० ) शेवटचें असे किंवा होय हें क्रियापद गाळण्याची प्रवृत्ति; ( ११ ) संवादिति वगैरे नामधातुही आहेत; ( १२ ) 'पाहों गेले' हें संयुक्त क्रियापद; याप्रमाणें भाषेचें स्वरूप आढळतें. ]

## ज्ञानेश्वर ( सन १२९० )

**माझा मऱ्हाटा चि बोलु कवतिकें । परि अमृतातें हीं पैजेसीं जिंके । ऐसीं अक्षरें चि रसिकें । मेळवीन ॥ १४ ॥ जिये कोवलिकेचेनि पाडें । दीसति नादिचे तरंग थोकडे । वेधें परिमळाचें बीक मोडे । जेयाचेनि ॥ १५ ॥ आइका रसाळ-पणाचेया लोभा । किं श्रवणीं चि होथि जीभा । बोलें इंद्रियां लागे कलभा । येकमेकां ॥ १६ ॥ साहाजें शब्दु तरि विषो श्रवणाचा । परि रसना म्हणे कां रसु चि आमुचा । घ्राणासि भावो जाये परिमलाचा । हा तो चि कां होईल ॥ १७ ॥ नवल बोलतिये रेखेची वाहाणी । दावितां डोलेयांहीं पुरों लागे आणि । ते म्हणति उघाडिली कां खाणि । रूपांची हे ॥ १८ ॥**

**जेथ संपूर्ण पद उभारे। तेय मन चि धावे बाहिरे। बोलुभुजांहीं आशे भरे। आलिंगावेया ॥ १९ ॥ ऐसां इंद्रियें आपुलालां भावि। झोंबतां परि तो सरिसेपणें चि बुझावी। जैसा एकला जग चेववी। सहस्रकरू ॥ २० ॥**

[ यांत ( १ ) बोलु, शब्दु, रसु, सहस्रकरू, हीं उ-कारान्त व विषो हें ओ-कारान्त, अशीं प्रथमेचीं रूपें आहेत; ( २ ) अमृतातें हें द्वितीयेचें रूप आहे; (३) पैजेसीं, रसिकें, बोलुभुजांहीं, सरिसेपणें, हीं तृतीयेचीं रूपें आहेत; ( ४ ) प्राणासि हें चतुर्थीचें रूप आहे, ( ५ ) नादिचें, परिमलाचा, रेखेची, हीं षष्ठीचीं रूपें; ( ६ ) जिये, रसालपणाचेया, इंद्रियां, येकमेकां, बोलतिये, आलिंगावेया, आपुलालां, हीं सामान्यरूपें आहेत; ( ७ ) कांहींच्या मताप्रमाणें कोवलिकेचेनि, जेयाचेनि, यांतील शेवटचा 'न' कार कानडींतून आलेला आहे; ( ८ ) मेलवीन, रसालपणाचेया, परिमलाचें, इ० ठिकाणीं नसलेला, पण पुढें एकनाथानें शुद्ध केलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रतींत आढळणारा 'ळ'कारही मूळचा नसून, कानडींतून आलेला आहे. क्वचित् ज्ञानेश्वरकालीन वाङ्मयांतही तो आढळतो, याचें उदाहरण वर दिलेंच आहे; ( ९ ) चि हें अव्यय व बोलु, शब्दु, रसु, इ० शब्द ऱ्हस्वान्त आढळतात; ( १० ) जींके, मोडे, लागे, म्हणे, उभारे, धावे, भरे, दीसति, बुझावी, चेववी, इ० जुन्या वर्तमानकाळाचीं रूपें आहेत; ( ११ ) कोवलिकेचेनि पाडें येथें ' पाडें ' हें शब्दयोगी अव्यय आहे. ( १२ ) ' भावों जाये ', 'पुरों लागे, ' हीं संयुक्त क्रियापदें आहेत; ( १३ ) अक्षरें, रसिकें, परिमलाचें, अमृतातें, रसाल, श्रवणिंचि, घ्राण, रसना, रूप, संपूर्ण, तरंग, पद, इंद्रियें, हीं शुद्ध संस्कृत शब्दांचीं रूपें आहेत; ( १४ ) मऱ्हाटा, कवतिक, जीभ, शब्दु, विषो, रसु, भावो, रेखा, बाहिरे, इ० तद्भव शब्द आहेत; ( १५ ) पैज, बीक, डोलेयां, हे निव्वळ देशी शब्द असावेतसें वाटतें. ]

ज्ञानेश्वर-कालीन मराठीचें स्वरूप नीट ध्यानांत येण्यासाठीं हें एवढें येथें विस्तारपूर्वक लिहिलें. या कालांतच निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव व मुक्ताबाई हीं भावंडें, नामदेव, गोरा कुंभार, सावता माळी, विसोबा खेचर, नरहरि सोनार, बंका महार, चोखा मेळा, परिसा भागवत, राका कुंभार, कान्हो पात्रा, सेना न्हावी, सजन कसाई, इ० मराठीची सेवा करणारी संत–मंडळी होऊन गेली.

## २. बहामनीकालीन मराठी ( १३५० ते १६०० )

यादवांच्या राजवटींत भाषेचें निर्मळ, स्फूर्तियुक्त स्वरूप कसें होतें, तें आपण पाहिलें. या राजवटींत मराठी-भाषा-मंदाकिनी नितांत-रमणीय रीतीनें वहात होती; परंतु हा प्रकार फार दिवस टिकला नाहीं. अल्लाउद्दीन खिलजी व त्याचा हस्तक मलीक काफूर यांच्या स्वाऱ्यांनीं सन १३१८ त देवगिरीचें राज्य बुडालें. त्यानंतर दक्षिणेंत बहामनी राज्याची स्थापना झाली व पुढें त्याचींही शकलें होऊन निरनिराळ्या ठिकाणीं आदिलशाही, कुतुबशाही, इ० शाह्या सुरू झाल्या; त्यांच्या कारकीर्दीतील मराठी भाषेच्या स्वरूपाचा आतां आपल्याला विचार करावयाचा आहे.

ह्या कालाला मुख्यतः एकनाथ–दासोपंताचा काल असें म्हणतां येईल. ह्या कालांत एकनाथानें ज्ञानेश्वरीचें संशोधन करून तिची नवी प्रत तयार केली. तीवरून व खुद्द एकनाथाच्या ग्रंथांवरून तत्कालीन मराठी भाषेला कोणतें स्वरूप प्राप्त झालें तें दिसून येईल. केवळ वेदान्त व भक्तिपर वाङ्मयांत जरी भयंकर भेसळीचें स्वरूप आढळत नाहीं, तरी रोजच्या व्यवहारांत इतर अनेक गोष्टींप्रमाणेंच फारसीनें मराठीला जेरदस्त करून टाकिलें होतें. सरकार–दरबारांत फारसी भाषा सुरू झाली व कागदपत्रही फारसींत राहूं लागले. ‘ अर्जदारां ’च्या ‘ फिर्यादी ’ ‘ काजी ’पुढें जाऊन, त्यांचा ‘ फैसला ’ किंवा ‘ इन्साफ ’ होऊं लागला. अग्रवादी, पश्चिमवादी, व्यवहार, वगैरे पूर्वापर धर्मग्रंथांत आढळणाऱ्या संज्ञा नाहींशा झाल्या; व त्यांच्या जागा मुसलमानी शब्दांनीं घेतल्या. पत्रांबदलीं ‘ कागद ’ आले; व त्यांवर प्रमाणांकरितां साक्षी होत असत त्या ‘ गोही ’ झाल्या. अधिकाऱ्यांचे ‘ मोकदम ’ झाले; आणि त्यांना प्रतिवर्षी मिळणाऱ्या वार्षिक वेतनाऐवजीं ‘ सालीना मुशाहिरा ’ मिळण्याचा ‘ सिलसिला ’ पडला. लोक स्वतःच्या बापाचें नांव पिते म्हणून न लिहितां ‘ बिन ’ योजून लिहूं लागले. राजेलोकांच्या सभोंवतालच्या मंडळींत तर साफच बदल झाला. राजसभेंत बैसणाईत होते तेथें ‘ दरबारी ’ आले. राजाबरोबर स्वारींत सवंदळी, दांडिवत, हाडपी, बारी, सागाळिय, चवरधरू, भांडारी, वेचकरू, देवहारू, दिवटे, बडवे, वगैरे सेवक असत ते आतां दिसेनासे झाले. झुंझुमल, अनुभीम, राईक, पाईक, मांडलीक, राऊत, रजपूत ( शस्त्रधारी शिपाई ) वगैरे हुद्दे आणि पदव्या, ऐकूं न

येतां, ' जमादार, ' ' हवलदार, ' ' शिलेदार, ' अशा प्रकारच्या पदव्या नव्यानें ऐकूं येऊं लागल्या.

आतां याच्याही स्पष्टीकरणासाठीं दोन-तीन उतारे देतों.

## एकनाथ, गद्य ( सोळावें शतक )

" अर्जदास्त अर्जदार बंदगी बंदेनवाज अलेकं सलाम साहेबांचे सेवेसी बंदे शरीराकार जीवाजी शेखदार बुधाजी कारकून प्रगणे शरीराबाद किल्ले कायापुरी सरकार साहेबांची आज्ञा घेऊन स्वार झालों तो प्रगणे मजकुरीं येऊन सरकार काम करावयास लागलों तो प्रगणे मजकूरचे जमेदार दंभाजी शेट्ये व कामाजी महाजन व मनीराम देशमुख व ममताई देशपांडीण व क्रोधाजी नाइकवाडी ऐसे हरामजादे फार आहेत ते सरकार कामाचा कयास चालूं देत नाहींत दंभाजी शेट्या कचेरीस येऊन जोम धरून बसतो मनीराम देशमुख आपलें काम परभारें करून घेतो ममताई देशपांडीण इणें तमाम प्रगणा जेरदस्त केला क्रोधाजी नाइकवाडी याणें तमाम तफरका केला "

[ हे एकंदर ८७ शब्द असून, यांत फक्त शरीराकार, जिवाजी, बुधाजी, कायापुरी, ममताई, इ० थोडेच शब्द संस्कृत किंवा संस्कृत शब्दांना प्रत्यय लावून बनविलेले असे आहेत. फक्त येऊन, घेऊन, धरून, हीं कृदन्तें व झालों, लागलों, आहेत, देतो, बसतो, केला, हीं क्रियापदें मराठी आहेत. बाकी जवळ जवळ निम्मे शब्द फारशी व फारशी प्रत्ययघटित अशा प्रकारचे आहेत. तत्कालीन व्यवहारांतलें मराठी हें अशा प्रकारचें होतें ! ]

## एकनाथ, पद्य

**जो सर्व वर्णांचा सहज धर्म । जेणें पाविजे परब्रह्म ।**
**जे नाशिती चित्त-भ्रम । ते गुण उत्तम अवधारीं ॥ १ ॥**
**हो का उपायो जेणें तेणें । पुढिलांसी जें सुख देणें ।**
**तें उपतिष्ठे मजकारणें । तो गुण म्यां श्रीकृष्णें वंदिजे ॥ २ ॥**
**तैसेंच परपीडा असुख । पुढिलियां न देणें दुःख ।**
**तेंही करूनि मज होय सुख । जाण निष्कंट उद्धवा ॥ ३ ॥**
**हो का अधर्माचिये जोडी । कोडी धरूनियां कवडी ।**
**रिघों नेदी दृष्टी बुडीं । फुटकी कवडी स्पर्शेना ॥ ४ ॥**

शिर तुटलिया पाठीं । हस्तपादादि क्रिया तुटी ।
काम निमालिया पाठीं । निमाली गोष्टी क्रोधाची ॥ ५ ॥
भूतप्रिय हितकारी । ऐसा पुरुष संसारी ।
मी भगवंत त्याच्या घरीं । सर्व हित करीं सर्वदा ॥ ६ ॥

एकनाथाच्या वरील गद्य व पद्य उताऱ्यांवरून तत्कालीन भाषेच्या दृष्टीनें पुढील गोष्टी आढळून येतील — ( १ ) यादवकालीन मराठीचें शुद्ध देशी स्वरूप होतें तें जाऊन बहामनी कालांत ती अधिकाधिक संस्कृतमय बनूं लागली; ( २ ) ' ळ ' तुरळक येत होता, तो आतां सररहा येऊं लागला; ( ३ ) पुढिलेयां, धर्माचेया, अधर्माचेया, तुटलेयापाठीं, निमालेयापाठीं, ह्यांबद्दल पुढिलियां, धर्माचिया, तुटलियापाठीं, असा सामान्यरूपांत फरक झाला. ( ४ ) धर्मुबद्दल धर्म, असा उ–कारान्त शब्दाऐवजीं अकारान्त शब्द लिहिण्याचा प्रघात पडूं लागला; ( ५ ) मियांबद्दल म्यां हें रूप आलें. ( ६ ) म्हणौनि, करौनि, या रूपांबद्दल म्हणोन, करोन, हीं रूपें प्रचारांत येऊं लागलीं; इ०.

मुसलमानी अमलाचा परिणाम कोठवर झाला तो वर दिसून येतच आहे. ( १ ) जरी वेदान्त व भक्तिपर ग्रंथांत फारसी शब्द फारसे घुसले नाहींत व सन्त-कवींनीं तो प्रांत शुद्ध राखण्याचा प्रयत्न केला, तरी अन्य प्रसंगीं फारसी शब्दांनीं मराठी शब्दाचा वाक्यांत कोठें मागमूस लागूं नये, इतकें तिला घेरून टाकिलें होतें. फक्त कांहीं नामें, सर्वनामें व क्रियापदें तेवढीं मराठी, बाकी सर्व फारसीमय. उदा०—' क्रोधाजी नाइकवाडी याणें तमाम तफरका केला ' यांत याणें व केला हे दोनच शब्द अविकृत शुद्ध मराठी आहेत. ( २ ) शेखदार, अर्जदार, यांतील ' दार ' हा प्रत्यय; तसेंच पीलखाना, उस्तरखाना, फरासखाना, यांतील ' खाना ' हा प्रत्यय; व यांसारखे शेंकडों प्रत्यय धूमधडाक्यानें मराठीशीं लगट करूं लागले. ( ३ ) किल्ले कायापुरी प्रगणे शरीराबाद ( किल्ला इ कायापुरी = कायापुरीचा किल्ला, प्रगणा इ शरीराबाद=शरीराबादचा परगणा ) यांतल्याप्रमाणें षष्ठीचा ' इ ' हा प्रत्यय मागील नामांस लावण्याची तऱ्हा सररहा सुरू झाली. ( ४ ) ' व ' हें उभयान्वयी अव्यय स्थायिकच होऊन बसलें. ( ५ ) ' ला ' हा चतुर्थीचा प्रत्यय फारसी ' रा ' पासून आला, असें कोणी म्हणतात. ( ६ ) अर्ज़्दास्त्, बंदेन्वाज् , यांतल्याप्रमाणें शब्दांतील अन्त्याक्षर व मध्यन्तरींचींही अक्षरें निभृत उच्चारण्याची लकब बळाऊं लागली. याप्रमाणें

ज्ञानेश्वरांनंतर शें-दीडशें वर्षांनीं एकनाथाचे कालीं मराठीचें स्वरूप होतें, असें वरवर पहाणारासही दिसून येईल.

ह्या कालांतील वाङ्मयाचे एकनाथ व दासोपंत हे दिग्गज होत. दोघांचीही ग्रंथ–रचना विपुल आहे. एकनाथांनीं आपल्या भागवताला काशींतल्या पंडितांकडून मान्यता मिळविली; व मराठी भाषा संस्कृतापेक्षां कोणत्याही प्रकारें कमी नाहीं, हें वदवून घेतलें. ज्ञानेश्वर–कालापासूनचा हा संस्कृत–मराठीचा झगडा मोरोपंतापर्यंत चालू होता असें दिसतें. एकनाथाचे आजे भानुदास, एकनाथाचे गुरु जनार्दनस्वामी, नरसिंहसरस्वती, गुरुचरित्रकार गंगाधर सरस्वती, हे संत या कालांतील ग्रंथलेखक होत. ह्यांशिवाय जनी जनार्दन, विष्णुदास नामा, विरेश्वर, नरसिंव्ह, रंगनाथ, इ० साधुसंत यांनीं याच कालांत आपल्या वाणीच्या सामर्थ्यानें मराठीची जोपासना केली. दासोपंताचे कांहीं ग्रंथ तर पासोडीवर लिहिलेले उपलब्ध आहेत.

## ३. शिवकालीन मराठी ( सन १६०० ते १७०० )

या कालांत स्वराज्यस्थापनेची जशी राजकीय घडामोड झाली, तशीच भाषेच्याही दृष्टीनें कांहीं घडामोड झाली. तुकाराम, रामदास, मुक्तेश्वर, वामन, विठ्ठल कवि इ० संत व कवि यांनीं मराठीची फार मोठी सेवा केली. यांनीं आणि खुद्द शिवाजी महाराजांनीं, फारसीला पायबंद घालण्याचा प्रयत्न केला. शिवाजीनें राजदरबारांतील शेंकडों फारसी शब्दांऐवजीं संस्कृत शब्द योजतां येण्यासाठीं ‘ राजव्यवहारकोश ’ तयार करविला; आणि पंत प्रधान, पंत अमात्य, इ० नावें आपल्या राज्यकारभारांत प्रचलित फारसी नांवांऐवजीं योजण्याचा प्रघात सुरू केला. वरील संत मंडळींचा मोठा उपकार हा कीं, नेहमींच्या व्यवहारांत जरी सरकार–दरबारीं व इतर कागदोपत्रीं फारसीनें जवळ जवळ आपलें अधिराज्य चालविलें होतें, तरी आपल्या वेदान्तपर किंवा भक्तिपर वाङ्मयांत तिला त्यांनीं वाटेल तसा धुडकूस घालूं दिला नाहीं. तें वाङ्मय त्यांनीं बरेंचसें निर्भेळ राखिलें; फार तर कांहीं शब्द त्या वाङ्मयांत सहजगत्या घुसले असतील इतकेंच. परंतु उपसर्ग, प्रत्यय, लकबा, त्यांनीं फारसीच्या फारशा उचललेल्या आढळून येत नाहींत. शिवाय संस्कृत देववाणी व प्राकृत अविद्वानांची भाषा, हा समज त्या कालींही बलवत्तर होताच. ज्ञानेश्वर, एकनाथ, ह्यांनीं तर या बाबतींत संस्कृत

पंडितांशीं झगडाच केला; हें वर आलेंच आहे. एकनाथ व हरिपंडित या प्रत्यक्ष पिता-पुत्रांचा देखील ह्या बाबतींत लढा होता हें सुप्रसिद्धच आहे. वामनपंडित हे तर बोलून-चालून पंडितच; ते आरंभीं मोठे संस्कृताभिमानी होते व मागून त्यांनीं रामदासांच्या सांगण्यावरून मराठींत ग्रंथ-रचना केली असें म्हणतात. ह्यामुळें ह्या संस्कृताच्या अभिमानाच्या अतिरेकांत निदान वेदान्त व भक्तिविषयक आणि ईश्वरकथा किंवा पौराणिक कथाविषयक ग्रंथांत मराठीच्या मूळ गाभ्याला भ्रष्ट करील असा फारसीचा शिरकाव झाला नाहीं. मात्र शिवाजीच्या चारित्र्यामुळें महाराष्ट्रांत ज्याप्रमाणें नवचैतन्य नांदूं लागलें, त्याप्रमाणें भाषेंतही ह्या कवींच्या शुद्धाचरणामुळें एक प्रकारें जोर उत्पन्न झाला. भाषा अधिक ओजस्वी, रोखठोक, संचालना उत्पन्न करणारी, भराऱ्या मारून उसळून वर येणारी, अशी दिसूं लागली. म्हणजे उदाहरणानेंच सांगावयाचें तर तुकारामाची भाषा रोखठोक पण शुद्ध पवित्र अशी; रामदासांची भाषा तितकी शुद्ध नसली तरी जोरदार व विचारांची खळबळ उडवून देणारी; वामनाची भाषा नवनवोन्मेषशालिनी, नूपुरांचा झणत्कार व इतर अलंकाराचा चमत्कार दाखवीत चमकत येणारी; अशी आढळून येते. भाषेला या प्रकारें त्या कालीं वैभवदशा प्राप्त होत चालली होती.

महाराष्ट्रांत शिवाजीराजे व संतकवि याचे हे प्रयत्न चालू असतां, तिकडे गोमंतकांत फादर स्टीफन्स ह्या नांवाच्या मिशनऱ्यानें ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याकरितां म्हणून मराठींत पण रोमन लिपींत ओवीबद्ध ख्रिस्तपुराण लिहिलें, ( सन १६१५ ). इकडे आलेल्या तत्कालीन युरोपियनांची मराठी भाषा कशा प्रकारची होती, याचा तो एक नमुना आहे.

शिवकालीन मराठीचें नीट आविष्करण करण्यासाठीं त्या कालांतीलही कांहीं उतारे देतों.

## शिवाजीचें कान्होजी जेधे यांस पत्र.

" श्रीमंत सकलगुण अलंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री कान्होजी जेधे देशमुख तपे भोर किल्ले रोहिडा प्रति राजश्री शिवाजीराजे जोहार येथील क्षेम जाणौनु स्वकीय कुशल लिहिणे तुम्ही पत्रिका पाठविली सकल अभिप्राउ कलो आला. लि० कीं खान अलीशानखान अजम येहीं लिहिलें आहे कीं, जावलीवरी सुरू केले आहे तरी तुमचा व त्यांचा पाहिलेपासून घरोबा आहे गेले तरी पाहिजे आमा खासा अगर पुत्र पाठवायाचे जाले तरी बोलभाक बरवे रिती

घेउनु मग जाणे दगा होये येसे न करणे......हरयेक करून तुम्ही राहणे दोन्ही गोस्टी तुम्हास लिहिल्या आहेती यांत तुम्ही स्याहणे असा बहुत लिहिणे नलगे ”

[ यांत खालील गोष्टी भाषेच्या दृष्टीनें आढळून येतात. (१) मायन्याचे ‘श्रीमंत सकल.......राजमान्य राजश्री ’ हे व ‘ प्रति, क्षेम, स्वकीय, कुशल, पत्रिका, ’ इ० शुद्ध संस्कृत शब्द आहेत. (२) अभिप्राऊ, भाक, बरवे, रिती, हे तद्भव शब्द आहेत; (३) गोस्टी, बोल, स्याहणे, घरोबा, हीं शुद्ध मराठी ठशाचीं रूपें आहेत; (४) जाणौनु, म्हणौनु, अशीं रूपें असून देउनु, घेउनु, अशींही रूपें आहेत; (५) एकंदर शब्दांपैकीं खान, अज्जम, सुरू, सीताब, तर्फ, किल्ला, आमा, इ० बरेच शब्द यवनी आहेत; (६) असिले, आहेती, असा, नलगे, हीं क्रियापदरूपें ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत; (७) किल्ले रोहिडा= किल्ला इ रोहिडा, तपे भोर, यांतल्याप्रमाणें षष्ठीचा ‘इ’ प्रत्यय मागील शब्दास लावण्याची प्रवृत्ति आतां पूर्णपणें भाषेला खिळून बसलेली दिसते; (८) ‘ जमेतीसी सीताब येणें ’ येथें ‘ सी ’ हा प्रत्यय चतुर्थीचा नसून, तृतीयेच्या ‘ शीं ’ करितां आलेला आहे, पण ‘ नजेरसी पडत असिले ’ येथें ‘सी’ हा अधिकरणार्थी चतुर्थीचा प्रत्यय आहे; (९) ‘ अभिप्राउ कलों आला ’ यांत ‘ कलों आला ’ हें संयुक्त क्रियापद आहे. (१०) कुशल लिहिणे, मग जाणे, यांतील ‘णे’-कारान्त धातुसाधिताचा विध्यर्थी क्रियापदाप्रमाणें उपयोग आहे. ]

## फादर स्टीफन्स ( सन १६१५ )

**परम शास्त्र जगीं प्रघटावेया। बहुतां जनां फळसिद्धि होवावेया॥ भासा बांधोनी मराठिया। कथा निरोपिली॥१२१ जैसा पुस्पांमाजी पुस्प मोगरी । की परिमळामाजी कस्तुरी॥ तैसी भासांमाजी साजिरी। मराठिया ॥१२३॥ पाक्षिआंमधें मैओरू। वृक्ष्यांमधें कल्पतरू॥ भासांमधें भासु थोरू। मराठिया ॥ १२४॥ तारांमधें बारा राशी। सप्त वारांमाजी रविसशी॥ भासांमधें भासु तैशी। मराठिया ॥ १२५॥**

## तुकाराम ( सन १६३३ सुमारें )

**देव वराडी वराडी। देठासाठी घाली उडी॥ देव भ्येड देव भ्येड। राखे बळीचे कवाड॥ देव भावीक भावीक॥ होये**

दासांचे सेवक ॥ देव होया देव होया । जैसा म्हणे तैसा तया ॥ देव ळाहान देव ळाहान । तुका म्हणे आणोरणं ॥

* * *

मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥
नाहीं तरी देऊं......लंगोटी। नाठाळाचे काठी हाणूं माथां ॥

* * *

महाराशी सीवे। कोपे ब्राह्मण तो न्हे ॥
तया प्रायश्चित्त कांहीं । देहत्याग करितां नाहीं ॥

* * *

आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्यां भटां झाली धणी ॥
अंतरीं पापाच्या कोडी । वरीवरी बोडी डोई दाढी ॥
...... तुका म्हणे ऐशा नरा । हाणून माराव्या पैंजारा ॥

तुकारामाच्या ह्या त्रुटित उताऱ्यांवरून त्याच्या वाणींतील प्रसाद, भक्ति, पावित्र्य, खंबीरपणा, आणि असद्‌गुणांबद्दल कठोरता, ह्या गोष्टी स्पष्ट दिसून येतात. वरच्यांपैकीं पहिला अभंग जगनाडी गाथेंतील आहे. पण तीच वाणी तुकारामाची असावी असें मला त्याच्या संस्कृतीवरून वाटत नाहीं. त्या मानानें पुढच्या अभंगांतील रूपेंच तुकारामाच्या वाणींतील असणें अधिक शक्य आहे.

## रामदास ( १७ वें शतक )

प्रपंच व परमार्थ —

गृहासी आग लागली। देखोनि कां बोंब केली ॥
लोकांची मांदी मेळविली। आगी विझवाया कारणें ॥१॥
तैसी परमार्थीं बोंब मारावी। कांहीं काढाकाढी करावी॥
हळू हळू सोडवावी। भिठी प्रपंचाची ॥ २ ॥
प्रपंच धुडका पेटला । मध्यें परमार्थ जळूनि गेला॥
ऐसें देखोनि तुम्हांला । कैसें बरें वाटतें ? ॥ ३ ॥

तरणोपाय —

कांहीं समुदाव करणें। येविषीं आलस्य न करणें ॥
आलस्य करितां उदंड उणें। दिसेल परमार्थी ॥ १ ॥

पोहणारें बुडते तारावे। सामर्थ्यें बुडों नेदावे॥
मूर्ख ते शहाणे करावे। विवेकी पुरुषें॥ २॥
सोइऱ्या धायऱ्यांचीं मुलें। तिक्षण बुधिचीं सखोलें॥
तयासी बोलणें मृद बोलें। करीत जावें॥ ३॥
निकट मित्री बरी होतां। मग त्यासी न्यावें एकांता॥
म्हणावें 'रे, भगवंता। कांहीं तरी भजावें'॥ ४॥
मान्य होतां जप सांगावा। मग तो इकडे पाठवावा॥
मग तयाचा सकळ गोवा। उगऊं आम्ही॥ ५॥

जोरदार उपदेश –

समर्थाचिया सेवका वक्र पाहे।
असा सर्व भू-मंडळीं कोण आहे?॥
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही।
नुपेक्षी कदा रामदासाभिमानी॥ १॥
सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा।
उडी घालितो संकटीं स्वामि तैसा।
हरीभक्तिचा घाव घालीं निशाणीं।
नुपेक्षी कदा रामदासाभिमानी॥ २॥

ह्या थोड्याशा उताऱ्यांवरूनही रामदासांच्या भाषेंतील जोरदारपणा, लोक-संग्रहाकरितां प्रयत्न, खळबळ उडवून देणारा व धीरोदात्त उपदेश, ह्या गोष्टी कळून येतील. शिवाय ह्याच्या रचनेंत नियमबद्धता नाहीं, शुद्धलेखनाचा धाक नाहीं, ('धीर् धरा धीर् धरा तक्वा, हड्बडूं गड्बडूं नका ही अनुष्टुप् वृत्तांतली ओळ!' असलें यांचें लिखाण) संस्कृताची जरब नाहीं, फारशीचा विधिनिषेध नाहीं, तींत भाडभीड कांहीं नाहीं, जसा कवि तशी त्याची रोखठोक भाषा. तो मनांत येईल तें बोलतो व बोलतो तसें लिहितो, ह्या गोष्टी आढळून येतील. देहे, सर्वै, बुधी, दुख, मृद, लिळा, ऊठिला, शक्तीन्सार, येहलोक, अवेवधान, प्रेत्न, मित्रिकी, खोळले, आमोल्य, वेर्थ, उधट, जीतुका, तीतुका, रघूनायेका, शांरीं, इछा, ऊदंड, नस्तां, जगदांतरीं, खतळ, क्रिडाभरें, मधूकरें, शूक, मयोर, श्रिरंग, श्रिकृष्ण, विधिभुगोळ, असे शब्द दडपण्यास तो कचरत नाहीं.

## वामनपंडित ( १७ वें शतक )

सीतास्वयंवर –

वाटे तया परम दुर्लभ ते नवोढा ।
जेव्हां पुरोहित म्हणे ' धनु कां न वोढा ? '
कोणी धरूनि बसला बसल्याचि ठायां ।
उत्साह बुद्धि न मनाप्रति दे उठाया ॥ १ ॥

छावा उठे दशरथ–प्रभु–दिग्गजाचा ।
घे चाप इक्षुसम तें पति भर्ग ज्याचा ॥
शुंडा स्व–बाहु उचलूनिच चालला हो ।
घेती समस्त नयनीं प्रभुचाच लाहो ॥ २ ॥

मुंगीस पक्ष फुटला उठला तसा रे ।
अन्योन्य हें वदति, हांसति चट्ट सारे ॥
श्रीराम हास्य–रस ये रिति भाव दावी ।
आतां कथा किमपि वीररसीं वदावी ? ॥ ३ ॥

गजगती जगतीप्रति दाविते ।
वसुमती सुमती सुख भाविते ॥
स्व–तनुजा–तनु जाणतसे धरा ।
नवरि ते वरिते मणि–कंधरा ॥ ४ ॥

नामसुधा –

हरिपण हरिनामें धातुमूर्तीस आलें ।
हरिमय हरिनामें विश्व संतांसि जालें ॥
भव–भय हरिनामें साधकांचें पळालें ।
वद वद वद जिव्हे, रामनामें रसाळें ॥ १ ॥

शर्व-कंठ-विष-गर्व हराया ।
नाम शक्तचि तुझें रघुराया ॥
सेतु सागर कपी उतराया ।
नाम सेतु भव–सिंधु तराया ॥ २ ॥

कृष्ण-दर्शन-सुख —

कड्यावरुनियां उडया प्रथम टाकुनी त्या गड्या ।
गडे पशुप भेटती तडतडां भुजीं आंगड्या ॥
फुगोनि तनु फाटती मणगटीं कडीं दाटती ।
सुखें अमित वाटती विरह-सिंधु ते आटती ॥१॥

किती प्रकारचीं व किती वर्णनें द्यावीं ? दिलेल्या पद्यांवरूनही वामनाचीं सुन्दर यमकें, मृदु लालित्ययुक्त भाषा, योग्य वर्णनशैली, संस्कृत-शब्द-प्रचुर प्रौढ व नाना अलंकारखचित अशी रचना, ह्या गोष्टी दिसून आल्यावांचून राहणार नाहींत. पूर्वीचें मराठीचें ओवी व अभंगयुक्त साधें रूप जाऊन आतां ती निरनिराळ्या वृत्तांत नटूं-मुरडूं व नाचूं-खिदळूं लागलेली आढळून येते.

तुकाराम, रामदास, वामन, यांच्याप्रमाणेंच आपल्या उत्कृष्ट वर्णनशैलीनें मोहविणारा एकनाथांचा नातू मुक्तेश्वर आणि प्रसिद्ध रघुनाथपंडित व आनंदतनय हे कवि याच कालांतील होत. येथें केवळ उतारे देणें ही मुख्य गोष्ट नसून त्या त्या कालांतील मराठीच्या भाषास्वरूपाची कल्पना देणें हा हेतु असल्यामुळें या सर्वांचे उतारे देतां येणें अशक्य आहे. ह्या मंडळींबरोबरच रामदासांचे शिष्य रंगनाथ स्वामी, केशव स्वामी; अनेक कूटें व चित्रकाव्यें रचणारा विठ्ठल कवि, नागेश, मोरया गोसावी, इ० कवींनीं मराठीची उत्कृष्ट प्रकारें सेवा केलेली आहे.

शिवकालीन मराठीचें स्वरूप वरील उताऱ्यांवरून ध्यानांत येईल. ( १ ) पद्यांमध्यें फारसीचा शिरकाव फारसा न होतां तें अविकृतच राहिलें. मात्र ( २ ) संस्कृत शब्दाचा व समासांचा भरणा यथास्थित होत गेला. ( ३ ) पद्याचे निरनिराळे वृत्त-प्रकार पूर्वी तुरळक आढळत असले, तरी आतां वामनादिकांच्या काव्यांनीं त्याला स्थिरता, बहुविधता व उत्कृष्टता प्राप्त झाली. ( ४ ) अलंकार-चमत्कारांनीं भाषा नटविण्याची प्रवृत्ति एव्हांपासून सुरू झाली. ( ५ ) तुकाराम, रामदास, यांनीं मात्र बहुंशीं अभंग व ओवी ह्या जुन्या वृत्तांतच रचना केली. ( ६ ) तुकारामाची वाणी प्रसादयुक्त, साधी, सोपी, जिव्हाळ्याची, अशी आहे. ( ७ ) रामदासांची भाषा निर्भीड, जोरदार व खळबळ उडवून देणारी पण धसमुसळी म्हणजे व्याकरणाला पारखी अशी आहे. ( ८ ) रामदासांशिवाय बहुतेक संत-कवींचा ओढा वेदान्त, भक्ति, वैराग्य, पुराणकथानिरूपण, यांकडेच

आहे. ( ९ ) कोणत्याच संत-कवींनी छन्दःशास्त्र, व्याकरण-शुद्धता, ह्यांकडे प्रामुख्यानें लक्ष दिलें नाहीं. ( १० ) वामनासारखा पंडितही ह्या गोष्टीस अपवादक नाहीं, मग 'अर्थारि तात्पर्य' अशा रामदासांची गोष्ट बोलावयासच नको!

गद्य लिखाणांत व बोलींत मात्र आणखी घडामोड झाली; मुसलमानी राजवटीचा परिणाम उत्तरोत्तर अधिक भोवल्यावांचून राहिला नाहीं. ( १ ) लेखनशुद्धीकडे कोणाचें लक्ष किंवा फुरसत नसल्यामुळें निरनिराळ्या लेखनांत एकाच शब्दाचीं निरनिराळीं रूपें आढळतात. उदा०- लखुजी-लुखजी जाधवराव, दियानतराव-द्यानतराव, औरंगजेब-अवरंगजेब, धर्मादाव-धर्मादाऊ, इ०. ( २ ) मराठींतल्या मराठींतच बोलभाषेप्रमाणें विचित्र अशीं अपभ्रष्ट रूपें फारच आढळतात. उदा०-आशिर्वाद, सदभट, विस्णदास, जाग्रुती, सत्येश्वर, धर्मपरायेण, छेत्रपती, दुकोळ, भोगोटा, थापना, धाशत, यैस्यास, भुशणें, स्याहाजी, कळहो, ळहान, लक्षमी, महादिभट, दरोज, छप्रपलंग, इ०. ( ३ ) फारसी वर्णांचा निभृत उच्चार आतां मराठींत बोलभाषेंत व तसल्या गद्य लिखाणांत कायमचा घुसला गेला. उदा०- मार्‍तो, कर्‍तो, जेव्‌ला, बस्‌ला, उठ्‌ला, इथ्‌ला, तिथ्‌ला, वर्‍चा, मध्‌ला, कर्, डर्, गमत्, इ०. ( ४ ) त्याचप्रमाणें कांहीं फारसी व्यंजनांचें मराठीच्या लेखनांत स्वरयुक्त पूर्ण अक्षरही झालें. उदा०- सरदार, दरबार, तरवार, इ०. ( ५ ) झुंजारराऊ, जिऊ, हुसेनु, असल्या ठिकाणीं नामांचीं ऊ-कारान्त रूपें केलेलीं आढळतात. ( ६ ) देसायान्, देशमुखान्, कारकुनान्, इ० प्रथमेचीं अनेकवचनें असून, त्यांस पुनः षष्ठीचा 'ई' प्रत्यय लावितात [ देशमुखान्+इ=देशमुखी ]. ( ७ ) महालासी, मसलतेस, आपणियासी, यैसियास, अशीं द्वितीयेचीं रूपें आढळतात; शिवाय द्वितीयेकरितां मूळरूपेंही वापरलीं आहेत. उ०- खान **सातारा** आला, इ०. ( ८ ) भटें, महाराजें, साहेबीं, येहीं, तेहीं, मियां, तुवां, अशीं तृतीयेचीं रूपें आहेत. (९) मौजे, किल्ले, यांतील मौजा+ई, किल्ला+ई, 'ई' या षष्ठीच्या प्रत्ययाबद्दल पूर्वी विवेचन आलेंच आहे. ( १० ) लोकीं, पूर्वे, उत्तरे, हवालां, इ० सप्तमीचीं रूपें आहेत. ( ११ ) गेलिया, सातारिया, आठा दिवसा, विसा (वर्षांचा), इ० सामान्यरूपें आहेत. ( १२ ) केसो त्रिमल ( नें ) लेहाया पाठविली, मलीक अंबर ( पासून ) भोगवटा ( चा ) आहे, हाजी बुन्हाण ( नें ) मालूम केले, पेशजी कारकीर्द ( त ) जो गुन्हा केला, इ० ठिकाणीं विभक्ति-प्रत्ययांचा लोप

आढळतो. ( १३ ) जे जे वस्तु, ते ते वर्तणूक, यांतल्याप्रमाणें प्रथमान्त एक-वचनी स्त्रीलिंगी सर्वनामें आहेत. (१४) विशेषणें विशेष्यापुढें घालणें, उ०–दिवसा दहांमध्यें, किल्ले मजकुरीं, हकीकती कैसी, इ०. ( १५ ) होए, आहेती, खातातीं, असेती, इ० वर्तमानकाळीं; दिधलें, खादली, पुसिलें, निजेला, इ० भूतकाळी; दीजे, कीजे, इ० कर्मणि; क्रियापदरूपें आहेत. (१६) लेहाया, आलिया, म्हणउनु, करुनु, सांगोन, पोहोचाऊन, कळौनु, इ० कृदन्तें आहेत. (१७) रोज, यैसा, दरोज, हाली, बरजोर, बेसक, हरीवख्त, इ० फारसींतून आलेलीं क्रियाविशेषण अव्ययें आहेत. (१८) शब्दयोगी अव्ययें मागें व पुढें अशा दोन्ही प्रकारांनीं वापरण्याचा प्रघात होता. उ०– त्यावरी, गेलियावरी, जधींपासून, वरीलीकडुनु; देखत परवाना, किल्ले कोंढाणा खाले ( कोंढाणा किल्ल्याखालीं ); इ०, ( १९ ) बस, अलबत, बेशक, बेलाशक, खूप, वाहवा, अफसोस, शाबास, खूष, इ० केवलप्रयोगी अव्ययें फारसींतून मराठींत आलेलीं आहेत. ( २० ) गनीमास घेरा केले, विलायती खराब जाला, त्यास हे नामाकुल गोस्ट न कीजे, कुसुर हो न देणें, तुम्ही पांढरीच्या कामास आलां आहां, इ० शेंकडों प्रयोग-विशेष फारसीपासून मराठींत उत्पन्न झाले आहेत.

याप्रमाणें शिवकालीन मराठीचें स्वरूप आहे. अंतर्बाह्य स्वरूपांत, रोजच्या बोलण्यांत व गद्य लिखाणांत आतां फारसीनें आपला इतका शिरकाव केला होता कीं, तिच्या अतीव वर्चस्वामुळें मराठी अज्जीबात नामशेष होते कीं काय असें वाटूं लागलें होतें; परंतु मागें लिहिल्याप्रमाणें शिवाजी व तत्कालीन साधु-संत यांच्या प्रयत्नांमुळें व जोपासनेमुळें तो प्रसंग मराठीवर गुजरला नाहीं; इतकेंच नव्हे, तर उलट मराठीनें फारसीचें एवढें उसनें घेऊनही तें आपल्या कामास लाविलें व पचवून टाकिलें.

या कालांत खलाशांचे, आरमारासंबंधाचे, पोशाखाचे, सैन्यांतील हुकुमा-संबंधाचे कांहीं शब्द — शिरपेंच, फालतू, कंपू, काडतूस, घमेलें, गर्णाल, पिस्तूल, परात, बतेला, सावण, मेस्त्री, फर्मा, इ० — मराठींत घुसले; पण त्यांनीं नुकसान न होतां मराठी शब्द-संपत्तींत थोडी-फार भर पडली, हा उपकारच झाला.

## ४. पेशवेकालीन मराठी (सन १७०० ते १८००.)

पेशव्यांचा काल म्हणजे स्वराज्याच्या भरभराटीचा काल होय. शिवाजीनंतर अनेक कर्तृत्ववान् मराठ्यांनीं झुंजारपणा प्रगट करून मराठी राज्य राखिलें; आणि पुढें शाहूच्या कारकिर्दीत मराठ्यांचा व्यवहार इतका वाढला कीं, त्याला सबंध हिंदुस्थान पुरेनासें झालें. ह्याचा परिणाम भाषेवरही घडून आल्यावांचून राहिला नाहीं. उत्तर-हिंदुस्थानांतील झगड्यांमुळें व निजामाशीं प्रत्यहीं होणाऱ्या कटकटींमुळें दिल्लीचीं व इतर ठिकाणचीं राजकारणें चालविण्यासाठीं फारसीच्या व्यवहारावांचून मराठ्यांचें चालूं शकलें नाहीं. उलट पूर्वीपेक्षां दस्तैवजी कागदपत्र, तहनामे, सरकार-दरबारचीं कामें, इनाम देणग्या वतनासंबंधाचे कागदपत्र, यांत फारसीचें प्राबल्य वाढतच गेलें. ह्या गोष्टीकडे लक्ष देण्यास त्या वेळीं कोणाला फुरसतही नव्हती.

ह्या कालांतील गद्य वाङ्मय म्हणजे शिवाजीची नव्वद कलमी बाकेनविशी बखर, सभासदी बखर, रामचंद्रपंत अमात्यांनीं लिहिलेलीं "आज्ञापत्र" नांवाचीं प्रकरणें (१७१६), पानिपत प्रकरणाबद्दल मोरो हरि व अंताजी माणकेश्वर यांनीं लिहिलेल्या बखरी, मल्हारराव होळकरांनीं पेशव्यांस ह्याच मोहिमेसंबंधीं लिहिलेली 'होळकरांची थैली,' कृष्णाजी शामरावाची 'भाऊसाहेबांची बखर' व श्रीमंत गोपिकाबाईसाहेब यांनीं रघुनाथ यादव यांजकडून लिहविलेली एक बखर, मल्हार रामराव चिटणीस यांचें 'राजनीति' नांवाचें एक प्रकरण, यांशिवाय कृष्णाजीपंत सोहोनी यांनीं लिहिलेली 'पेशव्यांची बखर' व इतर कांहीं बखरीवजा ग्रंथ होत.

त्याचप्रमाणें खुद्द बाजीराव, चिमाजी आप्पा यांचीं पत्रें; नानासाहेब, भाऊसाहेब यांचीं पत्रें; दिल्लींतील, पुण्यांतील, इंदूर-ग्वाल्हेर येथील, व निजामाकडील वकील यांचीं पत्रें; नानाफडणविसाचीं पत्रें व आत्मचरित्र; इ० पेशवेकालीन गद्य लिखाण डावपेचांनीं, मुत्सद्दीगिरीनें व व्यवहारचातुर्यानें भरलेलें असल्यामुळें तें पुष्कळ ठिकाणीं रसाळ असें उतरलें आहे व म्हणून त्यास वाङ्मयांत स्थान देण्यास हरकत नाहीं.

पद्य वाङ्मयाच्या दृष्टीनें पाहतां या कालांत श्रीधर, महीपति, मोरोपंत, रामजोशी, अनंतफंदी, इ० नामांकित कवि होऊन गेले. श्रीधरानें हरिविजय

रामविजय, पांडवप्रताप, इ० ग्रंथ ओवी–वृत्तांत लिहिले आहेत. याचे ग्रंथ लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांना प्रिय असे आहेत. शिवाय याच्याइतकी सोपी व रसाळ रचना दुसऱ्या कोणासही साधली नाहीं, असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. याच्याप्रमाणेंच महीपतिबुवा ताहराबादकर यांनीं भक्तविजय, भक्तलीलामृत, संतविजय, इ० ग्रंथ लिहिले; ते भक्तिमार्गी लोकांस आवडते असेच आहेत.

या कालांतील प्रसिद्ध कवि मोरोपंत यांची ग्रंथविषयक कामगिरी बरीच मोठी आहे. यांस कोणी 'महाराष्ट्र-कविवर' म्हणून अत्युच्च सिंहासनावर बसवितात, तर कोणी त्यास केवळ भाषान्तरकार म्हणून अगदींच सामान्य लेखतात. मोरोपंतांचा काव्य–रचना हेतु पाहिल्यास ह्या उभय मतांचा उलगडा पडेल. मोरोपंतांनीं स्वचित्तशुद्ध्यर्थ रामकथा निरनिराळ्या प्रकारें गाइली. आपलें भाषाप्रभुत्व दाखविणें वगैरे त्यांचा हेतुच नव्हता, मग केवळ 'पुराणकथांचा भाषान्तरकार' म्हणून त्यांस नांवें ठेवण्यांत अर्थ काय ? तें असो. तथापि त्यांच्या कवितेंत वीर, करुण, इ० रस भरपूर आढळून येतात; आणि इतरही अनेक काव्यगुणांमुळेंच त्यांच्या कवितांना एक प्रकारें स्वाद आणि विद्वन्मान्यता प्राप्त झाली आहे, यांत कांहीं शंका नाहीं (पांगारकर).

याच कालांतील रामजोशी, अनंतफंदी, इ० च्या काव्यासंबंधानें थोडीशी कल्पना देऊन पुढें वळणें बरें. ही व यांच्याप्रमाणेंच शेंकडों शाहीर मंडळी, पेशवाईच्या अखेरच्या कालांत सवाई माधवराव व शेवटचा बाजीराव यांच्या वेळीं होऊन गेली. यांनीं आपल्या कवनांचा निराळाच थाट उडवून दिला. कटाव, फटके, लावण्या व पोवाडे ह्या चटकदार नवीन चालींतील कवनांवर त्यांनीं अधिक भर दिला. ह्यांपैकीं बहुतेक मंडळी खड्या सुराची व उत्कृष्ट गाणारी असे; आणि त्यांतच महाराष्ट्राच्या आवडीचे व प्रत्यक्ष पाहिलेल्या लढायांचे वीररसात्मक विषय, व स्वराज्याचीं वैभवदर्शक वर्णनें, ह्या सर्वांच्याही वर म्हणजे विलासीजनांना मोहून टाकणारें शृंगारिक वर्णन, ह्या गोष्टींमुळें यांचीं कवनें ऐकण्यास लोकांचा फडच्या फड जमत असे. त्यांचीं कांहीं नीतिपर व वैराग्यपरही कवनें असत; तींही चटकदार चालींत रचलेलीं असल्यामुळें मनोहर आहेत. रामा सटवा, लहरी मुकुंदा, होनाजी बाळा, प्रभाकर, सगनभाऊ, परशुराम, इ० या मालेंतील प्रमुख मंडळी होत.

या कालांतील कर्त्यांच्या काव्याची नीट कल्पना येण्यासाठीं कांहीं उतारे देतों.

## श्रीधर

गजवदनासी म्हणे यशोदा । गुण देईं माझिया मुकुंदा ॥
संकष्टचतुर्थी सर्वदा । न सोडीं मी जाण पां ॥ १ ॥
वचन ऐकोनी कृष्ण-नाथें । सत्य कराया गणेशातें ॥
खोडी नाहीं केली अनंतें । एक मासपर्यंत ॥ २ ॥
यशोदा म्हणे आली प्रचिती । धन्य धन्य देव गणपती ॥
तों सर्वेचि आली चतुर्थी । संकट हर्त्री सर्वांचें ॥ ३ ॥
...विस्मय मायेसी वाटला । म्हणे रे घननीळा ॥
नैवेद्य अवघा काय झाला । हारा पडिला रिता कां ? ॥४॥
श्रीकृष्ण म्हणे वो माते । सत्य मानीं वचनातें ॥
एक सहस्र उंदीर येथें । आले होते आतां हो ॥ ५ ॥
त्यांत एक थोरला मूषक । त्यावरी बैसला विनायक ॥
सोंडेनें लाडू सकळीक । एकाएकीं आकर्षिले ॥ ६ ॥

इत्यादि मोहक वर्णन ऐकून कोणत्या खोड्याळ बालकांना आनंद होणार नाहीं ? व कोणत्या वत्सल मातांना प्रेम–पान्हा फुटणार नाहीं ?

## निरंजनमाधव

काशीक्षेत्र –

गंगापुत्र गुमान फार धरिती, घाटीं सदा हिंडती ॥
कंगालासि पिडा करूनि धरिती 'दे दक्षिणा' मागती ॥
थोडी घेति न, बोलती खलमती, नानापरी पीडिती ॥
आंगासी झटती, किचाट करिती, हाणोनि घेती किती १

हें गंगापुत्रांचें वर्णन यथायोग्य नाहीं काय ?

## मोरोपंत

रुक्मिणी-हरण –

माळा ऊचालितां प्रिय आपणाहि रथावरूनियां लवला ॥
लव लागे ना तों घे अंकीं करुणा–समुद्र कालवला ॥ १ ॥

...हंसें मुक्ता नेली मग केला कलकलाट काकांनीं ॥
हाकांनीं नभ भरलें, जाय सुरांच्याहि नाद हा कानीं ॥ २ ॥

कुंभकर्ण-निद्रा —

विंध्य तसा निजला तो, वदनदरीमाजि निबिड अंधार ॥
फार भयंकर भासे पाताळाचेंचि काय तें दार ! ॥ १ ॥

हीं शब्दचित्रें किती मजेदार आहेत !

गंगावर्णन —

देवि ! दयावति ! दवडिसि, दासाची दुःख-दुर्दशा दूर।
पापांतें पळवितसे; परम पवित्रे, तुझा पयःपूर ॥ १ ॥

यांतील अनुप्रास किती साहजिक व सुंदर साधला आहे ?

स्वोद्धारार्थ प्रार्थना—

दयामृतघना अहो हरि ! वळा मयूराकडे ।
रडे शिशु तयासि घे कळवळोनि माता कडे ॥
असा अतिथि धार्मिकस्तुतपदा ! कदा सापडे ? ।
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासा पडे ॥ १ ॥

## काशिकवि

सुभद्रा-याचना —

हरिची भगिनी म्हणे सुभद्रा, रुक्मिणि-वहिनी दया करा ।
दादाला तुम्हि कळवुनि वळवुनि, अर्जुनजीचा शोध करा ॥ध्रु०॥
आइ-बापांचा श्रीकृष्णाचा विचार मोडुनि बलदेवें ।
दुराग्रहानें निश्चय केला, सुयोधनाला मज द्यावें ॥
भाउ नव्हे हा बाउच केवळ भावुनि मनांत उमजावें ॥
वडिल बंधु परि अडिल खोडकर खळाकडिल हें समजावें ॥
हंसा टाकुनि काय वायसा मुक्ताफळ हें अर्पावें ! ।
जन्मान्तरिंचा वैरी भाऊ असें यावरुन वळखावें ॥
अपाय याला उपाय न सुचे काय करावें विष खावें ।
दुर्योधन खळ हेला मेला गळा उलथुन पोटभरा ॥१॥ दादाला०

याप्रमाणेंच पुढें. याच्या इतक्या सोप्या व हृदयंगम कवितेचा मासला क्वचि-तच आढळेल.

## रामजोशी

लावणी उपदेशपर –

भला जन्म हा तुला लाधला खुलास हृदयीं बुधा–
धरिसि तरि हरिचा सेवक सुधा ॥ ध्रु० ॥
चराचरीं गुरु तरावयाला नरा शिरावरि हरी–
जरा तरि समज धरीं अंतरीं ॥
काय गळ्यांत घालुनि तुळशीचीं लाकडें ?
हीं काय भवाला दुर करतिल माकडें ?
बाहेर मिरविशी आंत हरिशिं वाकडें
अशा भक्तिच्या रसारहित तूं कसा म्हणविशी बुधा ?–
हरि–रस सांडुनि घेसी दुधा ॥ १ ॥ भला० ॥

## लहरी मुकुंदा

देशस्थितिपर लावणी –

धन्य वंश एकेक पुरुष कल्पवृक्ष पिकले ।
शत वर्षें द्विज पक्षि आनंदें त्या तरुवर टिकले ॥
जलचर, हैदर, नबाब, सन्मुख रण करतां थकले ।
ज्यांनि पुण्याकडे विलोकिलें ते संपत्तिला मुकले ! ॥

## प्रभाकर

पेशवाईचा शेवट –

यशस्वी झाले श्रीमंत पहिले सर्व लढायाला ।
आतांच आलें अपेश कोठुन बाजीरायाला ॥
जे श्रीमंत सकुमार ते वनांतरीं भटकत फिरती ।
कळले तिकडे भर दिवसा प्रभु कांट्यांमधि शिरती ॥
आपला घोडा आपण स्वहस्तें चुचकारुन धरिती ।
खालीं पसरुन उपवस्त्र दिलगिरींत वर निद्रा करिती ॥
कुंकवावांचून कपाळ, मंगळसूत्रावांचुन गळा ।
तसा सैन्य–समुदाय उदासिन रंग दिसे आगळा ॥

अशा प्रकारची पेशवाईच्या उत्तर–कालांतील ह्या शाहीर मंडळींची कविता आहे. ऐश्वर्य, संपत्ति व त्याबरोबरच रंगेलपणा ह्या गोष्टी ह्या कवींच्या काव्यांत अधिक आढळून येतात. कवनें उत्कृष्ट, खडा आवाज, रागदारीच्या ताना, नव्या नव्या ढंगांच्या चाली, आवडता रस, ह्यांच्या योगानें तत्कालीन जन-समाज वेडावून गेला असला, तर त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं. छेकापन्हुतींत या सर्व कवींचा तुरा जो रामजोशी, त्यांनीं "अशी रचाया दुजी कुणाची माय व्याली भूवरी ?" असें शेवटीं विचारिलें आहे. तो आपल्याला "कविराय" असें म्हणवून घेतो; आणि "अशी कोण वर्णि सदालिका । इतर कवि कविरायाहुनि किका" असे तो अभिमानोद्गार काढितो; प्रत्यक्ष कविता पाहिल्यावर रसिकाला-ही तसें वाटल्यावांचून राहत नाहीं. अनंत फंदीसंबंधानेंही असाच प्रकार आहे.

## होनाजी बाळा

**फंदी अनंत कवनाचा सागर अजिंक्य ज्याचा हातखंडा ।**
**चमत्कार चहुंकडे चालता मष्टावर ज्याचा झेंडा ॥**
**वाचावंत संपत्ति सारखी, बहुतांचें तनमन हरकी ।**
**लंगेलुंगे कवि भेदरले, अवघ्यांवर त्याची गुर्की ॥**
**समोर गातां कोणि टिकेना मनामधीं बसली कर्की ।**
**धन ज्याचा हातचा मळ केवळ तो रुपयांचा हंडा ॥ १ ॥**

आतां ह्या कालांतील गद्य–सारस्वताकडे वळूं.

## रामचंद्रपंत अमात्य ( आज्ञापत्र )

राज्यास सावकारांची जरुरी—

"साहुकार म्हणजे राज्याची व राज श्रीचीः शोभा. साहुकाराच्या योगानें राज्य आबादान होतें...साहुकाराचे संरक्षणामध्यें बहुत फायदा आहे. तसेंच दर्यावर्दी सावकार यांसही बंदरोबंदरीं कौल पाठवून आमदरफ्ती करावी. साहु-कारांमध्यें फिरंगी व इंग्रज व वलंदेज व फराशिस व डिंगमारादि टोपीकर हेही लोक सावकारी करितात, परंतु ते वर्कड साहुकारांसारखे नव्हेत. यांचे खावंद प्रत्येक प्रत्येक राज्यच करीत आहेत. त्यांचे हुकुमानें त्यांचे होत्साते हे लोक साहुकारीस येतात. राज्य करणारास स्थळलोभ नाहीं असें काय घडों पहातें? ...यांची आमदरफ्ती आले गेले इतकीच असूं द्यावी."

यांत किती अनुभव व चातुर्य साठलेलें आहे, तें विचार करणारास कळून येईल.

## चिमणाजी आप्पाचें पत्र

वसईची लढाई—

" ...फिरंगीयांनीं गरनाळाच्या पोत्यास आग लावून मार केला व रेजागिरीच मार सीमेपरता केला. लोकांवरी अग्नीचा पर्जन्य करून भाजून काढिलें. फिरंगीयांनीं मरदुमी शिपाईगिरी करावी तैशी केली. त्याप्रमाणें इकडील लोकांनीं भारती युद्धासमान युद्ध केलें. थामार्गे युद्धें बहुत जालीं परंतु या लढाईस जोडाच नाहीं. सर्व स्वामींचा आशीर्वाद. स्वामींच्या दंडकप्रहारेंकरून फिरंगी बेहिंमत होऊन अष्टमीस प्रहर दिवसास कौलास आले. स्वामींनीं वसई दिली. त्रिवार लिहिलें ते शब्द अन्यथा कसे होतील ? अन्यथा वसई वसई होती व फिरंगी आगीचा पुला होता " इ०.

ही प्रत्यक्ष कार्यकर्त्यांची कसलेली भाषा आहे.

## नानाफडनवीस ( आत्मचरित्र )

पानिपतचा शेवट—

" दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकालचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा आरंभ जाहला....मी श्रीमंतांसन्निध ईश्वरस्मरण किंचित् करून असें. तों विश्वासराव यांस गोळी लागली. पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनीं घालून उभेच राहिले. तों पठाण पायउतारा आंत येऊन मिसळले. तोंडातोंडी होऊं लागली. आणि डावे बाजूचे मातबर सरदार चौघड्याचे धनी देखील, पूर्वींच पळाले. उजवे बाजूचेहि होळकर, शिंदे, निघोन निशाण निघालें. दोन तीन शत पायदळ होतें. श्रीमंत दिसतनासे जहाले. तेव्हां ईश्वरें बुद्धि दिली. माघारे फिरलों. लक्ष सैन्य, त्यांत मोठे मोठे सरदार असतां एकही त्यासमयीं श्रीमंतांस आप्त न जाहला. बहुत दिवस अन्न भक्षिलें. कृपा पुत्रवत् केली. चांगला काल होता तेव्हां केशास ढका लागल्यास प्राण देऊं अशा प्रतिज्ञा. परंतु ईश्वर घटित विपरीत काळ त्यांत सोबती कोण होतो ? सर्व सुखाचे सोबती. भोजन आदरेंकरून करावें. वस्त्रें, जवाहीर, जागिरा घ्याव्या. निदानीं इतकें असून ज्यांचे देहाचें ठिकाण कोणास ठाऊक नाहीं ! "

पेशव्यांच्या कालांतील गद्यासंबंधाचे एवढे नमुने पुरेत. त्यांवरून भाषेच्या फरकासंबंधानें कांहीं अनुमानें ठरवितां येतील. (१) शिवाजीच्या कालांतल्या

पेक्षांही पेशव्यांच्या कालांत सरकारी, दस्तैवजी व लढाई, तह, वगैरेसंबंधींच्या कागदपत्रांत फारसीचा जोर अधिकच वाढला; परंतु (२) तो खासगी पत्रांत तितका वाढलेला दिसत नाहीं. उदा०—रामचंद्रपंतांचें आज्ञापत्र किंवा नाना फडनविसाचें आत्मचरित्र, यांत फारसी शब्दांचा अतिरेक दिसत नाहीं. तेंच चिमणाजी आप्पाच्या युद्धसंबंधीं पत्रांत (गर्नाळा, बरकंदाजी, तोफजी, इ०) शेंकडा साठांचे वर शब्द यवनी सांपडतील. (३) संस्कृत शब्दांचा भरणा करण्याची जी प्रथा शिवकालांत पडली, ती कायमच टिकली; म्हणून सरकार-दरबाराशिवाय इतर लिखाणांत संस्कृत शब्दहि पुष्कळ आढळतात. (४) शुद्ध निर्भेळ देशीकार लेणें जवळ जवळ लुप्तच झालें म्हणावयास हरकत नाहीं. (५) त्याजवरोन, त्यादारभ्य, फिरंगीयांनीं, किंनिमित्त कीं, प्रोत्साहनानिमित्य, इ० शब्दप्रयोग अठराव्या शतकाच्या प्रथमार्धांतील लिखाणांत आढळतात; (६) ते उत्तरार्धांतील लिखाणांत तितके आढळत नाहींत. नानाच्या आत्म-चरित्रांतील भाषेस कांहीं अलीकडील वळण लागलेलें दिसतें. (७) सामान्य लिखाणांत शद्धाशुद्धतेकडे फारसें लक्ष नसल्यानें सवशय, मृत्य, माहाभारत, सप्तरिसी, कर्तुत्व, येश, येथास्थित, परायेण, भ्रौंश, विच्यार, च्यार, युध्य, गोस्ट, विज्यापूर, सिव्या, असले शब्द सामान्य लेखकांच्या लेखनांत आढळतात. (८) कांहीं शब्द दुहेरी लिहिले जात. अपसूत–अपसूक, उघडीप–उघडीक, अदमासें–अजमासें, नदर–नजर, खाजगी–खासगी, गुजरणें–गुदरणें, तसबीर–तजबीर, इ०. (९) कारकुनी लिखाणांत ए ऐ ओ औ बद्दल ये यै वो वौ असें लेखन जास्त प्रचारांत आलें. उ०– ऐसीजे=यैसीजे, ऐवजीं=यैवजीं, एक=येक, औषध=वौषध, इ०. (१०) पुणियास, डेरियासी,–द्वितीया; त्यांणीं, जाती-नसीं–शीं, चोरटियांनीं, श्रीमंतांहीं,–तृतीया; तलेगांवींहून,–पंचमी; सातारीं गेलों,–सप्तमी; अशीं विभक्तिरूपें ह्या कालांत आढळतात. (११) आहेची खबर, हत्तीची लढाई मंधीं, चांभारगोंदेयास, इतकीयावर, कारखानेयांत, बोल-लियाचा, अशा प्रकारचीं सामान्यरूपें आढळतात. (१२) विशेष्याच्या पुढें विशेषण घालण्याची प्रवृत्ति या कालांत टिकूनच राहिली. खूळ मातबर, सरदार मातबर, इ०. (१३) कांहीं नवीन शब्द नवीन व्यवहारामुळें प्रचारांत आले. अक्षतमरिष्ट, इदं न्यायें, उपरोधिक, उपरशब्दी, आंतरभाव, बाहेरभाव, कमकसर, गर्गशा, खामखां, कुचोद्य, कौल, कमरबंदी, झांबडा झांबड, डौल,

नक्षा, द्वामुष्यायण, धातुपोषण, दुरंदेशी, पायउतारा, फलादेश; भाईचारा, शकट-भेद, बजिन्नस, परिच्छिन्न, बालाग्र, रुबरू, हर्शामर्श, इ०. ( १५ ) कारकून, ( कार्यकर्ता, पत्रलेखक ); हवालदार ( जबाबदार, कांहीं शिपायांवरील मुख्य ); जमादार ( सर शिपाई, टोळीचा नायक ); खबरदार (बातमीदार, याद राख); इ० शब्दांत अर्थभेद झालेला आढळतो. (१५) यांशिवाय शेंकडों प्रयोगविशेष व म्हणीही व्यवहारांत हरहंमेश नव्याच रूढ होऊं लागल्या होत्या. खूळ उभें करणें, तुमचें गोत्रघटित होळकरासी, आमचे लोकांचें कैसें विकतें? धुळीचे दिवे खात जाल, आलस असिला न पाहिजे, या झाडास येरंडयाचीं फळें आलीं, लहान माणसाचे पंक्तीस बसावें लागतें हाच मृत्य आहे, घोडा स्वाधीन नसल्यास बसणारा काय करील? हत्तीचे तोंडीं लाकूड देऊन कार्य बिघडलें, फितुरांत होते त्यांचें शीड उभारलें, शुस्क वृक्षास पल्लव फुटून पुस्पित फलित होतो तद्वत्, सहजांची आरती सहजांचा गजर, कल्पवृक्षाखालीं झोलीस गांठी याव्या हें अपूर्व, ससयाचे पारधीस वाघाचें साहित्य करावें लागतें, जैसें मरतिया अमृतपान द्यावें तैसें जालें, इ०.

पद्याच्या बाबतींत शिवकालीन भाषा व पेशवेकालीन भाषा यांत फारसा फरक पडला नाहीं; मत्सरू, गोडू, किंवा दाहो, मोहो, असलीं ऊ–ओ–कारान्त रूपें आतां कमी होत चालली होतीं. भाषेंत ठाकठिकी जास्त येऊं लागली; आणि सर्वांत मोठा फरक म्हणजे पेशवाईच्या उत्तरकालांत शृंगारात्मक काव्याला ऊत आला. तीं काव्यें कितीही सरस असलीं तरी, आणि त्या कालांत शिपाई बाण्याच्या हजारों लोकांना व सरदारमंडळींना तीं रिझवीत असलीं तरी, एकंदरींत असभ्यच होत.

## ५. सद्यःकालीन मराठी गद्य व पद्य

### [ सन १८०० ते १८३६ ]

आतां इंग्रजी अमदानींत आपल्या मराठीला कसकसें वळण लागत गेलें, ह्या गोष्टीचा विचार करण्यापर्यंत आपली मजल आली आहे. या कालाच्या आरंभींचा मराठी ग्रंथसंपत्तीच्या दृष्टीनें सुगावा काढितां, महाराष्ट्राच्या बाहेर दृष्टि फेकावी लागते. कलकत्त्याजवळ श्रीरामपूर येथें डॉ० कॅरे यांनीं नागपूरच्या पंडित वैद्यनाथशास्त्र्यांच्या मदतीनें सन १८०५ मध्यें एक मराठी व्याकरण व १८१० त एक इंग्रजी–मराठी कोश हे ग्रंथ छापून प्रसिद्ध केले होते. डॉ० कॅरेनें ख्रिस्ती धर्माच्या

प्रसारार्थ एकंदर ४० देशी भाषांत बायबलाचीं भाषान्तरें करविलीं होतीं असें म्हणतात. इकडे मुंबई इलाख्यांत सन १८२२ मध्यें 'बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी' स्थापन झाली व तिनें "बालबोधास बक्षिस १०० ते ४०० रु० प्रौढ ग्रंथ-चांगलीं भाषान्तरें किंवा नवीन ग्रंथ-२ ते ५ हजार रु०. याहूनही विशेष केल्यास विशेष शिफारस गौरनर यांस होईल" अशी घोषणा जाहीर केली. ह्या सोसायटीच्या, कंपनी सरकारच्या व तत्कालीन देशी भाषांविषयीं आस्थेवाईक अशा बड्या युरोपियन अधिकाऱ्यांच्या साह्यानें कोश व बरींच सुबोध, गोष्टीरूप व भाषान्तरित पुस्तकें निर्माण झालीं. त्यांत पंडित मंडळींनीं तयार केलेला महाराष्ट्र कोश (म०-म०-किं० ४०); केनेडी कोश (इं०-म०-किं० १२) मोल्स्वर्थ व कँडी याचा कोश (म०-इं० किं० ९०); बाळगोष्टी, बाळमित्र, नीतिकथा इ० गोष्टीरूप व मनोरंजक पुस्तकें; ग्रँट डफची 'मराठ्यांची बखर' या पुस्तकाचें भाषान्तर, पंडित-मंडळाचें व्याकरण व कांहीं जुजबी शास्त्रीय ग्रंथ; इ० कांहीं किरकोळ व महत्त्वाचे ग्रंथ प्रसिद्ध झाले. या कालच्या लेखकांत बापू छत्रे, बाळशास्त्री जांभेकर, जगन्नाथशास्त्री क्रमवंत, बापूशास्त्री शुक्ल, गंगाधरशास्त्री फडके, अशी – विशेषतः अष्टागर प्रांतांतील मंडळी – प्रमुख होती. तत्कालीन भाषेचा नमुना—

## बापू छत्रे ( बाळमित्र )

"आतां तीं तिसऱ्यानें रुसलीं, तीं अशीं कीं, मागल्येपेक्षां अधिक एक-मेकांवर दांत-ओठ खाऊं लागलीं. मग कामू छडी फेकली होती ती आणायास गेला, तों छडी कोणी मोडून टाकिली होती. जाईनें भुईवरून बाहुली हातीं घेतली, तों तिचीं चिरगुटें फिटलीं आहेत. मग कामू निसास टाकूं लागला; जाई रडूं लागली. इतक्यांत जेवणाची वेळ झाली. आबाजी त्यांस पुसायास गेला कीं, 'हवें असलें तर पान वाढितों.' तो दोघांस तशीं पाहून म्हणतो, 'मुलांनो, तुम्हांस आज झालें तरी काय?' तीं म्हणालीं, 'कांहीं नाहीं बाबा.' आणि डोळे पुशीत तीं त्याच्या मागें जेवणघरांत गेलीं. त्या दिवशीं जेवावयास नाना-प्रकारचीं पक्वानें केलीं होतीं. तीं जेवावयास बसलीं त्यावेळीं बाप त्यांस म्हणतो, 'मुलांनो, तुम्हीं हीं पक्वानें फार खाऊं नका; यांपासून तुम्हांला उपद्रव होईल; पण तुम्हीही स्वतंत्र आहां त्यापेक्षां तुमचा इच्छेस येईल तें खा प्या'."

या उताऱ्यावरून व इतर लिखाणावरून या कालांतील पुढील प्रकारचे भाषा-विशेष नजरेस आल्यावांचून राहणार नाहींत. ( १ ) शुद्ध, सोपी, बालबोध, मराठी भाषा; परंतु ( २ ) भाषान्तर कृत्रिम, सफाईदार नाहीं. ( ३ ) असी, अस्या, नकाश्या, दिवसीं, अशा प्रकारचीं रूपें आढळतात. (४) माझे लाडक्या, त्याचे मनास, माझा बरोबर, मागल्येपेक्षां, त्याचा कांठाशीं, अशीं पहिल्या शब्दांतल्याप्रमाणें षष्ठयन्त सामान्यरूपें आढळतात. ( ५ ) आणायास गेला, पुसायास लागली, भोगायाचें पडतें, इ० यांत हल्लीं असणारा ' व 'कार तेव्हां आढळत नाहीं. (६) जाई म्हणत्ये, बोलत्ये, अशीं स्त्रीलिंगी वर्तमानकाळाचीं रूपें आढळतात. (७) जंव, तंव, तंवपर्यंत, मातक्यान, अशीं क्रि० वि० अव्ययें उपयोगांत आलेलीं आढळतात. ( ८ ) पान वाढितों, छडी फेकिली, ती मोडून टाकिली होती, यांतल्याप्रमाणें धातूस ' इ ' आगम होऊन क्रियापदें उपयोगांत आणलेलीं दिसतात. ( ९ ) चिरगुटें फिटलीं आहेत, निसास टाकूं लागला, श्वास गुदमरला, असले वाक्प्रयोग आढळतात. ( १० ) बापड्यांनो, लेकरांनो, विश्वासारखी कढू, बुकी, भुई, जेवणघर, काकळूत, असले शुद्ध देशी शब्द या मनोरंजक गोष्टीरूप बालवाङ्मयांत मुद्दामच वापरले असावेतसें वाटतें. तरी ( ११ ) स्वाद, स्वतंत्रता, पारिपत्य, विपत्ति, नौका, अशा संस्कृत शब्दांचीही पकड सुटलेली दिसत नाहीं. ( १२ ) आबाजीनें ' त्यांला ' औषध दिलें, ' त्यांणीं ' तें ' घेऊं आदरिलें, ' यांतील चतुर्थी, तृतीया व सं० क्रि०, हीं रूपें ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत. याप्रमाणें हल्लींची मराठी व तत्कालीन मराठी ह्यांत स्वरूपतः ढोबळ फरक आहे. ( १३ ) अन्न चांगलें पण परक्याकडून मागून आणलेलें, ह्यामुळें एकंदरींत वाक्यरचनेंत कृत्रिमता अधिक दिसून येते.

## [ सन १८३६ ते १८५७ ]

हें इंग्रजी अमदानींतील दुसरें वाङ्मययुग होय. ह्या कालांत दादोबा पांडुरंग, हरी केशवजी, गोपाळराव हरी देशमुख, भाऊ महाजन, इ० नामांकित ग्रंथकार होऊन गेले. दादोबा पांडुरंग तर्खडकर हे मराठीचे पहिले व्याकरणकार होत, असें तात्पर्यार्थानें म्हणण्यास हरकत नाहीं. यांच्यापूर्वी महानुभावीयांचीं व्याकरणें — पं० भीष्माचार्य यांचें " पंचवार्तिक " (१३ वें शतक) — व डॉ० कॅरेचें

पं० वैद्यनाथशास्त्री यांच्या मदतीनें केलेलें व्याकरण १८०५, इ० प्रयत्न झाले होते. दादोबांनीं आपल्या व्याकरणाची पहिली आवृत्ति १८३६ त छापिली. त्यापूर्वी गंगाधरशास्त्री फडक्यांच्या व्याकरणाच्या हाती प्रति तयार करून अध्ययन केलें जात असे. अर्थात् दादोबांचें " महाराष्ट्र भाषेचें मोठें व्याकरण " हाच शिळा-प्रेसवर छापलेला पहिला व नांव घेण्यासारखा प्रयत्न होता; म्हणून " दादोबा हे आमचे पाणिनी आहेत " असें म्हणतात, तें सामान्यतः बरोबर आहे. त्यांच्या व्याकरणामुळें भाषेला स्थैर्य आलें आणि 'दादोकृताचा' अंमल मराठीवर दीर्घकाळपर्यंत टिकला, यांत शंका नाहीं.

याच कालांत दर्पण, प्रभाकर, ज्ञानप्रकाश, ज्ञानोदय, हीं वृत्तपत्रें व दिग्दर्शन, ज्ञानप्रसारक, इ० मासिकें उदयास आलीं. त्यांत विविध विषयांवरील लेख येऊं लागले. छापखान्यांच्या सोयीमुळें ह्या गोष्टी सुलभ झाल्या. गोपाळराव हरि देशमुख ऊर्फ ' लोकहितवादी ' यांनीं 'शतपत्रें' लिहून लोकांत जागृति उत्पन्न केली. त्यांच्या लेखांत जरी विद्वत्ता नव्हती, तरी आस्था व कळकळ ज्यास्त होती. इतर गद्य लिखाण सामान्यतः रूपान्तरितच होतें: स्वतंत्र लेखन असें दादोबांचें; व्याकरणाशिवाय मोरोपंतांच्या केकावलीवरील त्यांची 'यशोदा—पांडुरंगी ' ही टिकाही उत्कृष्ट अशीच आहे. स्वतंत्र असल्यामुळें त्यांचें वाङ्मय मोलाचें आहे.

## दादोबा पांडुरंग तर्खडकर

### महाराष्ट्र-भाषा—

" अलीकडेस मराठींत गद्यरूपानें लिहिण्याचा प्रचार चांगला वाढत चालला आहे. तेव्हां अशा समयीं व्याकरणद्वारानें भाषेचें नियमन करणें किती आवश्यक आहे हें सुज्ञ पुरुष जाणतच असतील. हाच हेतु मनांत धरून मीं ही दुसरी आवृत्ति सिद्ध केली. इचा मुख्य उद्देश हाच कीं, जितकें साधेल तितकें करून, आजपावेतों जिला नियमांत आणण्याविषयीं कोणीं प्रयत्नच केला नाहीं म्हणोन अत्यन्त विस्कळीत झालेली व व्याकरणरूप फणीनें जिला कोणीं विंचरलेंच नाहीं म्हणोन जींत अनेक ग्रंथि जमून फारच गुंतलेली, अशी जी ही मराठी भाषा तिला कांहीं तरी नियमांत आणावी; आणि दीर्घकालग्रथित जी तिची गूत ती हातीं घेऊन तिचे पदर कांहीं सोडवून कांहीं तरी उकलण्याच्या धोरणांत आणून बसवावी."(महाराष्ट्र भाषेचें मोठें व्याकरण सन १८३६).

## लोकहितवादी

शतपत्रांचा इत्यर्थ--

" लोकहितवादीनें कोणाची मजुरी पत्करली नाहीं. कशाची अपेक्षा, आशा किंवा इच्छा धरली नाहीं. कोणाचे सांगण्यावरून कृत्रिम वर्णन केलें नाहीं. लाभावर किंवा द्रव्यावर नजर देऊन कीर्ति व्हावी या हेतूनें लिहिलें नाहीं. इतके श्रम जे केले ते फक्त लोकांस त्यांची वास्तविक स्थिति कशी आहे ती कळावी, त्यांनीं सुधारावें, त्यांस इहलोकीं सुखवृद्धि व्हावी, परलोकाचें साधन घडावें, व आपले बहुत काळापासून दृढ ग्रह झाले आहेत त्यांपैकीं कांहीं अविचारानें व कांहीं मूर्खपणानें जडलेले आहेत ते कमी व्हावे किंवा नाहींसे व्हावे, इतक्याच हेतूनें मीं यथामति व स्वइच्छेनें वेतनावाचून श्रम केले आहेत; व जितकें लिहिलें आहे तें अक्षरशः खरें खरें निवडून विचार करून काळजीनें लिहिलें आहे, हें सर्व लोकांस नजर आहे. "

## ज्ञानोदय

मद्यपानबंदीबद्दल अर्जी

" महाराष्ट्र देशांतील मुसलमान लोक व जैन लोक व चांगल्या जातीचे हिंदु या सर्वांस दारूचा निषेध आहे आणि सर्व अब्रूदारांस या दुर्व्यसनाचा कंटाळा वाटला म्हणून या अनर्थाचा प्रतिबंध चांगला होता. परंतु आतां बहुत लोक दारू पिऊं लागले आणि दारूचीं दुकानें सर्वत्र घातलीं असतां उत्तरोत्तर अधिक लोक पिणारे होऊन भयंकर नाश होईल. मोठ्या शहरांत तर हल्लींच हा अनर्थ चालू झाला आहे व तो दिवसानुदिवस वाढत आहे. तर असल्या अनर्थकारकांस सरकारनें अनुकूल न होतां त्यांचें काम अवश्य बंद केलें पाहिजे. " इ०.

एवढ्या उताऱ्यांवरूनही ह्या कालांतील भाषेला आधुनिकी वळण कसें लागत चाललें होतें तें कळून येईल. पेशवाईपर्यंतची बखरींतील भाषा हे जुन्या गद्याचे नमुने होत; परंतु पेशवाईनंतरच्या मराठी गद्याला आधुनिकी वळण लागलें तें अद्यापि चालूच आहे. ( १ ) आधुनिकी वळण म्हणजे इंग्रजी भाषेच्या संस्कारामुळें मराठी विविध अंगांनीं संचार करूं लागली. ह्या कालापर्यंत मराठींत कांहीं कोश, व्याकरणें व यशोदा-पांडुरंगीसारखे अगदींच थोडे पण नव्या वळणाचे ग्रंथ तयार झाले. वृत्तपत्रें व मासिकें हीं विविध ज्ञानप्रसाराचीं नवीन साधनें निर्माण झालीं. त्यांतून कांहीं शास्त्रीय, बरेंचसें धार्मिक आणि जगांतील उलाढालीं-

संबंधाचें ज्ञान लोकांस मिळूं लागलें. (२) एकंदरींत लिखाण रूपान्तरित म्हणून कृत्रिमच होतें. (३) "मुलें जीं स्वतंत्र व्हायास इच्छीत होतीं" अशा प्रकारचे इंग्रजी धर्तीवरचे प्रयोग ह्या कालच्या गद्य लिखाणांत पुष्कळ घुसले होते. (४) भाषेंत साधेपणा फार. (५) मनोरंजक शालोपयोगी वाङ्मयावर भर ज्यास्त. (६) ह्या कालांतील मराठी गद्य म्हणजे अंगावर कपडे किंवा दागिने नसलेलें लहान मूल होय असें म्हणतां येईल. मुलांत जें स्वाभाविक सौंदर्य व एकदम उफाड्यानें वाढत जाण्याचे गुण असावयाचे ते ह्या नव्या अवतारांतील बाळांत होते यांत शंका नाहीं; हें त्याच्या पुढील बाळसेदारपणा-वरून सहज दिसून येतें. (७) एक गोष्ट मात्र या काळांतील गद्य लिखाणांत स्पष्ट आढळून येते कीं, मुसलमानी शब्द व वाक्प्रचार यांचें वळण जात चाललें, तें आतां बरेंच कमी झालें आहे; आणि (८) त्याची जागा इंग्रजी शब्द व वाक्प्रचार यांच्या वळणानें भरून काढिली आहे.

## [ सन १८५७ ते १८७४ ]

सन १८५४त सरकारी विद्याखातें निर्माण झालें, १८५७ त मुंबई, कलकत्ता व मद्रास येथें विद्यापीठें स्थापन होऊन नवीन युगास आरंभ झाला. हें युग शास्त्री-मंडळींचें होय. त्यांच्या कर्तबगारीमुळें मराठीला चांगलेंच बाळसें येऊं लागलें. ह्या सर्वांत परशुरामपंत गोडबोले अग्रगण्य होत. परशुरामपंत तात्या हे वाङ्मयोपवनांतील माळीपणाच्या कामांत फार कुशल होते. त्यांनीं जुन्या कवींच्या उत्कृष्ट वेच्यांचा "नवनीत" नांवाचा एक ग्रंथ प्रसिद्ध केला, त्याची योग्यता अद्यापिही कायम आहे. ह्याशिवाय त्यांनीं उत्तररामचरित, वेणीसंहार, मृच्छकटिक, इ० संस्कृत नाटकांचीं गद्य-पद्यात्मक उत्कृष्ट रूपान्तरें केलीं आहेत. मोल्स्वर्थ व कँडी यांच्या कोशाचे कामीं तात्या हे कँडींचे उजवे हात होते. त्यांचें 'वृत्तदर्पण' हें सर्वांच्या परिचयाचें आहेच. ह्यांच्याप्रमाणेंच कृष्णशास्त्री राजवाडे यांनीं विक्रमोर्वशीय, मालतीमाधव, मुद्राराक्षस, इ० चीं भाषान्तरें; तसेंच गणेश शास्त्री लेले यांनींही साहित्यशास्त्रावरील व इतर कांहीं भाषान्तरित ग्रंथ लिहिले.

संस्कृतांतून मराठींत ह्या प्रकारें वाङ्मयवृद्धि चालू असतां कृष्णशास्त्री चिपळूण-कर ह्यांनी इंग्रजींतून मराठींत भाषान्तरित ग्रंथ निर्माण केले. कृष्णशास्त्र्यांच्या इतकें सुरस व उत्कृष्ट भाषान्तर करणारे क्वचितच आढळतील. त्यांनीं रासेलसचें

भाषान्तर, अरेबियन नाइट्सचीं भाषान्तरें, अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह, इ० उत्कृष्ट भाषान्तरित पुस्तकें लिहिलीं. दादोबांच्या व्याकरणावर टीकात्मक असे उत्कृष्ट निबन्धही त्यांनीं लिहिले. कृष्णशास्त्री हे महा बुद्धिमान् होते. त्यांचे गुरु मोरशास्त्री साठे यांना, त्यांनीं वादांत एकदां कुंठित केल्यामुळें आपल्या अंगावरची शाल मोरशास्त्र्यांनीं या ' कृष्णा ' ला देऊन त्याचा गौरव केला होता. पेशव्यांच्या दक्षिणेंतून निघालेल्या " पुणें पाठशाळें " त ही बहुतेक तत्कालीन शास्त्री मंडळी तयार झालेली होती.

ह्याच कालांत विनायक जनार्दन कीर्तने ह्यांनीं ' माधवराव ' व ' जयपाळ ' हीं स्वतंत्र नाटकें लिहिलीं. त्या कालीं लोकांस तीं फार आवडलीं असें म्हणतात. मंजुघोषा व मुक्तामाला ह्या कादंबऱ्या या कालांत उदयास आल्या. प्रसिद्ध लोकहितवादींनीं " ज्ञानप्रकाश " पत्र मनःपूर्वक श्रम घेऊन चालविलें (म० ग० अ० ८८ ). त्यांनीं ऐतिहासिक गोष्टी, राजस्तानचा इतिहास, पृथ्वीराज चव्हाण, इ० जीं पुस्तकें लिहिलीं त्यांवरून त्यांची चौकसबुद्धि व निरलसता दिसून येते. याप्रमाणें मराठी भाषेच्या ग्रंथसमृद्धीप्रीत्यर्थ चोहों अंगांनीं या कालांत प्रयत्न होऊं लागले; त्यांची नांवनिशी येथें थोडक्यांतही देतां येणें शक्य नाहीं.

## कृष्णशास्त्री चिपळूणकर

### शब्दपांडित्य

" राजपुत्र ज्या दिवशीं तेथें गेला होता, त्या दिवशीं एक मोठा पंडित उंच स्थानीं बसून श्रोत्यांस उपदेश करीत होता...' विवेक आणि सद्वासना यांपेक्षां काम–क्रोधादि दुर्वासना प्रबळ झाल्या असतां मनुष्याचा स्वभाव बिघडून तो नीचत्वाला पावतो; तसेंच अविचार म्हणजे भ्रान्ति दुर्वासनांचें मूळ आहे; त्या अविचाराचें प्राबल्य अन्तःकरणांत झालें म्हणजे अयोग्य मनुष्याच्या हातीं राजसत्ता आली असतां जसें होतें तसा जिकडे तिकडे गोंधळ व अव्यवस्था होते; कामक्रोधादि बंडखोर बुद्धीच्या किल्ल्यांत शिरून विवेकरूप राजाचा अंमल मानीनातसे होतात; ' इ० गोष्टी अनेक प्रकारच्या उदाहरणांनीं स्पष्ट करून त्यानें श्रोत्यांच्या मनांत बिंबवून दिल्या. " ( रासेलस ).

भाषान्तर असलें तरी कृत्रिमता बिलकुल नाहीं. यांत भाषेचा अस्खलित ओघ, प्रौढता, सौंदर्य, शुद्धता, परकीय वाक्प्रचारांचा अभाव, ह्या गोष्टी स्पष्ट आढळून येतील.

## परशुरामतात्या गोडबोले

वर्षावर्णन

हा मेघ आर्द्रमहिषोदरतुल्य काळा।
शंखाकृती धरि करांत बलाक-माळा ॥
विद्युत्प्रभा-वसन पीत कसोनि हातें।
वाटे दुजा हरिच आक्रमितो नभातें ॥ १ ॥
मेघोदरांतून जलाच्या धारा। भूमीवरी पडती झरारा॥
जैशा शुद्ध रजताच्या तारा। विद्युत्प्रकाशें झळकती ॥२॥
विद्युल्लतांनीं जळतेंच काय?
धारा-जळांनीं गळतेंच काय? ॥
बलाहकांनीं हसतेंच काय?।
वायुभ्रमें निःश्वसतेंच काय? ॥ ३ ॥
विद्युज्जिव्हा लांबवोनी। इंद्र-चाप-भुज उभारोनी।
मेघ हनुवटी खालवोनी। जांभई देतसे अंतरिक्ष ॥ ४ ॥

यांतील सरलता, प्रौढता, माधुर्य, अलंकारप्रचुरता, हीं स्पष्ट कळून येतील.

## विनायक जनार्दन कीर्तने

राजाचें स्वप्न

"स्वप्न असें पाहिलें कीं, मी वाडयांतून निघून गंगातीरीं गेलों; आणि तेथें पाहतों तों अमर्याद पूर आला असल्यामुळें ती गंगाबाई दुथडयांचें उल्लंघन करून, महावेगानें 'फूं फूं' असा शब्द करीत चालली होती. कोणी म्हणेल, ही बया गिरिराज जनकावर रुसून, तट्ट फुगून, गाल्हाणें गातच, रत्नाकराकडे जात आहे कीं काय, कोण जाणे! इतक्यांत तिची ती शीघ्र गति मंद झाली; तिच्या प्रचंड लाटा कमी झाल्या; तिचें विस्तीर्ण पात्र आकुंचित झालें; सारांश, कोणी म्हणेल,

सख्या रत्नाकरानें अंजारून गोंजारून हिचें सांत्वन केलें. इकडे आसमंताद्भागांच्या प्रदेशांत नाना तऱ्हांचीं धान्यें इतकीं विपुल उगवलेलीं दिसलीं कीं, आज पृथ्वीनें आपलें सर्वच वैभव बाहेर काढलें आहे कीं काय, असा मला घटकाभर भास झाला ! " ( जयपाळ नाटक )

## महादेव मोरेश्वर कुंटे

बाल संभाजी

**असें बोलती माय तों शंभु आला ।**
**घुसे आंत; काठीवरी स्वार झाला ॥**
**हंसूं लागली सुज्ञ आजी; मुलाचा -**
**करी लाड ताईत मानी गळ्याचा ॥ १ ॥**
**चिमुकली पगडी झळके शिरीं ।**
**चिमुकली तरवार धरी करीं ॥**
**चिमुकला बहु शोभत चोळणा ।**
**चिमुकला सरदार निघे रणा ॥ २ ॥**
**छबुकडा चिमणा करितो गुण ।**
**चिमुकलें धरलें मग रंगण ॥**
**दुडदुडां पळतां पळतां पडे ।**
**गडबडे रडतां मुख बापुडें ॥ ३ ॥**

ह्या कालीं मोरोपंताच्या कवितेवर बराच वाद चालू होता; व कांहीं बडीं धेंडें मोरोपंत हा कविच नव्हे, असें प्रतिपादणारीं होतीं. तेव्हां मराठी साध्या व सोप्या कवितेचा म्हणून जो नमुना मानला जात होता तो या प्रकारचा होता.

## [ सन १८७४ ते १९०० ]

सन १८७४ त विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपली 'निबंधमाला' सुरू केली. ह्या वेळेपासून मराठीच्या नवीन युगास आरंभ होतो. शास्त्रीबोवांनीं आपल्या निबंधमालेंत आमच्या देशाची सांप्रतची स्थिति, मराठी भाषेची स्थिति, डॉ० जॉन्सन, लोकहितवादी, मोरोपंताची कविता, इ० विषयांवर जे ओजस्वी व तेजस्वी लेख लिहिले, त्यांच्या योगानें सुशिक्षितांत तरी फार मोठी जागृति उत्पन्न झाली, ही गोष्ट नाकबूल करून चालणार नाहीं. उत्कृष्ट

निबन्ध, उत्कृष्ट उतारे, उत्कृष्ट चरित्रें, उत्कृष्ट टीका, उत्कृष्ट नाट्यकृति, उत्कृष्ट भाषा, ह्या गोष्टी कशा असाव्या हें सांगणारा निबंधमाला हा एक आदर्शच होता; त्यामुळें राजकीय, सामाजिक, धार्मिक, काव्यविषयक, नवलकथात्मक, अशा अनेक अंगांचें वाङ्मय निर्माण झालें. निबंधमालेशिवाय केसरी, सुधारक, करमणूक, ह्या तत्कालीन साप्ताहिकांनीं निरनिराळ्या क्षेत्रांत जें कार्य केलें तें चिरस्मरणीय आहे. केसरीची भारदस्त भाषा, सुधारकाची प्रसंगानुरूप ओघवती सडेतोड भाषा, करमणुकीची साधी, सोपी, गोड व लालित्यात्मक भाषा, ह्यांनीं समाजावर उद्दिष्ट तो परिणाम घडवून आणिला हें स्पष्ट आहेच.

## विष्णुशास्त्री चिपळूणकर

### कडक टीका म्हणजे काय ?

" आमच्या कित्येक कोमल व सभ्य देशबंधूंचा आम्हांवर असा आक्षेप येईल कीं, ' तुम्हांस कोणाचीं मतें अग्राह्य वाटलीं, तर तीं खोटीं म्हणून तुम्ही सिद्ध करा. '...पण तीव्र व सौम्य लेखाविषयीं आमचें तर असें मत आहे कीं, वरील प्रयोग प्रतिपक्ष्याचा लेख ज्या मानाचा असेल त्याप्रमाणें करणें वाजवी आहे. जो सभ्यवादी आहे त्यावर जर प्रतिपक्षी तुटून पडेल व तीक्ष्ण वाक्प्रहार करील तर तें शोभणार नाहीं; पण जो मुळींच कोणाची मुरवत न धरतां ' तुम्ही पशु आहां ' येथून पांडित्यास आरंभ करील त्याचा अंमळ खरपूस समाचार घेतला असतां कोणी दोषी होईल असें आम्हांस वाटत नाहीं. " ( निबंधमाला )

## बाळ गंगाधर टिळक

### इंग्रजी शिक्षणाचा परिणाम

" इंग्रजांच्या सहवासापासून आम्हांस जे पुष्कळ लाभ झाले आहेत, त्यांतच शिक्षणाची गणना प्रमुखत्वानें करण्याचा प्रघात आहे. पण जरा विचार केला असतां, आपणांस असें आढळून येईल कीं, हें पाश्चिमात्य शिक्षण अगदीं एकांगी असून,त्या शिक्षणाचा परिणामही तसाच झाला. इंग्रजी शाळांतून पहिल्या पहिल्यानें जी मंडळी बाहेर पडली, त्यांच्या मनाची स्थिति एक प्रकारें फारच भयंकर किंवा शोचनीय झालेली होती. समाजाच्या परंपरागत बंधनांबद्दल आदर असावयाचा तो नाहींसा झालेला, आणि दोन–चार बुकें झाल्याबरोबर बऱ्याच मोठ्या पगाराची जागा त्या वेळीं मिळत असल्यानें, अधिकारमदाचाही बराच अंमल त्यांच्या मनावर बसलेला होता. " इ०. ( केसरींतील निबंध ).

## गोपाळ गणेश आगरकर

### स्त्री–पुरुषांचें एकत्र शिक्षण

" परंतु असला आग्रह काय कामाचा ? असल्या एकदेशीय तत्त्वज्ञानास कोण विचारतो ?...युरोपीय समाजास जी एक प्रकारची उल्हासवृत्ति प्राप्त झाली आहे, ती त्याच्या मिश्रणामुळें प्राप्त झाली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. मिश्र-समाजानें नीति सूत्र ढिलें पडतें, असें कित्येकांचें म्हणणें आहे; पण ज्यांना मिश्र–समाजाचा प्रत्यक्ष अनुभव नाहीं त्यांचें हें मत आहे, एवढें ध्यानांत ठेविलें पाहिजे. गोषाबाहेर किंवा जनान्याबाहेर नीति असण्याचा संभव नाहीं हें बोलणें जितक्या शहाणपणाचें आहे, तितक्याच शहाणपणाचें वरील मत आहे. " ( सुधारकांतील निबंध ).

## हरि नारायण आपटे

### ती काळरात्र !

" हे शब्द पुरते माझ्या तोंडून निघतात न निघतात, तों पुनः तें काळरक्त एकदम तोंडावाटे बाहेर आलें !...मी जवळ गेलें त्याबरोबर माझ्या हातावर हात ठेवला, आणखी कांहीं ओठ हालविलेसें मला वाटलें. मी 'दादा, दादा,' करून ओरडलें. दादा जवळ आला. दादाचा हात धरून माझ्याकडे पाहिलें. आणखी कांहीं बोलण्याची इच्छा आहेसें दाखविलें. मला त्यावेळीं कुठलें धैर्य आलें कोणास कळे ! मीं अगदीं गडबड न करितां तोंडापाशीं कान नेला. तों 'आईला...अंतर...देऊं...नको...कोणी...नाहीं...शंकरमामा...पॉलिसी...पेटींत' असे अर्धवट शब्द उच्चारले. पुढें काय म्हणावयाचें होतें तें त्या शब्दाच्या पाठोपाठ आलेल्या गुळणींतच गेलें ! " ( पण लक्षांत कोण घेतो ).

## शिवराम महादेव परांजपे

### रायगडावरील संपत्ति

" या रायगडावर जी अनेक प्रकारची संपत्ति सांठविलेली आहे, तीमध्यें स्वातंत्र्यप्राप्तीच्या साधनांचीही संपत्ति तेथें जी भरलेली होती ती त्याच्या मनामध्यें प्रकाशित होऊं लागली...त्याची जन्मदात्री आई जी मरण पावली होती, तिचें त्याला यावेळीं स्मरण झालें; पण तिच्या स्मरणामुळें त्याच्या अंतःकरणाला

दुःख न होतां त्या सभोंवतालच्या सृष्टींतील प्रत्येक उपकारक वस्तूमध्यें त्याला त्याची आई दिसूं लागली. नाना प्रकारचीं धान्यें उत्पन्न करणारी ही भूमि, मधुर फळें निर्माण करणारे हे वृक्ष, जेथें जावें तेथें शीतल पाणी पाजणाऱ्या ह्या नद्या, श्रमपरिहरण करणारा हा मंदप्रवाही वायु, हा सर्व अन्नांचा परिपाक करणारा सूर्यनारायण, आणि मी जेथें निद्रासेवन करूं इच्छीन तेथें माझ्याकरितां प्रेमाचा पाळणा तयार करून देणारी ही भूमि, या प्रत्येकाच्या ठिकाणीं मी माझी आईच पाहत आहें, अशी व्यापक वृत्ति त्याच्या मनामध्यें उत्पन्न झाली." (का० नि०)

या उताऱ्यांवरून आजच्या मराठीला कसकसें वळण लागत गेलें, तें कळून येईल. प्रत्येकाचें भाषावैशिष्ट्य मात्र या छोट्या छोट्या उताऱ्यांत पूर्णपणें आढळून येण्यासारखें नाहीं. ( १ ) शास्त्रीबोवांच्या जोरकस प्रतिपक्षाशीं जशास तसें या प्रकारच्या वाग्युद्ध करण्याच्या व प्रमाणबद्ध आणि शुद्ध अशा भाषेची आपल्यास कल्पना करितां येऊं शकेल. त्यांची जाडी विद्वत्ता, त्यांचा निरुत्तर करणारा कोटिक्रम, त्यांची छाप बसविणारी भाषापद्धति, त्यांचा खोचदार विनोद, त्यांची सुभाषितें वगैरे योजून प्रबंध मनोरम करण्याची हातोटी, त्यांची लेखनाची ठाक-ठिकी, इ० गोष्टी वरील उताऱ्यांवरून 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायानें अजमावतां येतील. ( २ ) टिळकांच्या मर्मभेदक भाषेचा नमुना जरी त्यांच्या वरील उताऱ्यांत आढळला नाहीं, तरी त्यांच्या जहाल लेखणीची किंचित् तरी जाणीव झाल्यावांचून राहणार नाहीं. ( ३ ) आगरकरांच्या लेखणींतील समाज-हिताविषयींची तळमळ आणि अनेक प्रमाणांनीं आपले विचार निर्भीडपणें मांडण्याची त्यांची हातोटी हीं कांहीं अंशीं ध्यानांत येऊं शकतील. टिळकांच्या भाषेंत–विवेचनांत–वकिली भरपूर आढळेल; भाषेचा नटवेपणा बहुधा आढळणार नाहींच; पण आगरकरांच्या भाषेचा प्रवाह जलौघाप्रमाणें धांवत राहूनही तिच्यांत उपमा-रूपकादि भरपूर आढळल्यांवाचून रहावयाचीं नाहींत. जोरदारपणा मात्र उभयतांच्या भाषेंत सारखाच असल्यामुळें दोघांचेंही लेखन उत्कृष्ट परिणाम-कारक झालें आहे. ( ४ ) हरिभाऊ आपटयांच्या यथातथ्य वर्णनशैलीचा वर दिलेला मासलाही त्यांच्या भाषेचें कौशल्य प्रकट करण्यास पुरेसा आहे; आणि ह्या कारणानेंच तो तो प्रसंग किंवा तीं तीं पात्रें हुबेहूब डोळ्यांपुढें शब्दचित्रद्वारा आल्यानें, हरीभाऊंच्या कादंबऱ्यांना मनोरंजक व कलात्मक वाङ्मयांत अग्रस्थान मिळालेलें आहे. ( ५ ) शिवरामपंत परांजपे यांच्या भाषेचा विलास, एक एका

गोष्टींचें अनेक चढत चढत किंवा उतरत उतरत गेलेल्या वाक्यांनीं विवरण, वेचक व मार्मिक विशेषणयोजना, शून्यांतून सृष्टि उत्पन्न करण्याची म्हणजे जें थोडेंसें दृश्य आढळेल, त्यावर काव्यात्मक कल्पना करून, तें सुंदर रंगवून सोडण्याची प्रतिभाशक्ति, अप्रतिहत वाणीचा ओघ, आणि पर्यवसान देशाभिमानयुक्त प्रेरक वाक्यांत; खोंचदार, श्लेषात्मक, अलंकारप्रचुर आणि व्यंग्यार्थक, उपरोधिक किंवा अप्रस्तुत–प्रशंसात्मक विचारसरणी, ह्यांपैकीं कांहीं गोष्टींचा किंचित् अंश त्यांच्या वरील उताऱ्यांत आढळेल.

टिळकांचें ' गीतारहस्य ' व केसरींतील लेख हे त्यांच्या भाषावैशिष्ट्याचे नमुने आहेत. ' सुधारकांतील' निबंध हे आगरकरांच्या भाषावैशिष्ट्याचे नमुने आहेत. हरिभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्या त्यांच्या लालित्ययुक्त भाषेचे नमुने आहेत. शिवरामपंत परांजपे यांची उपरोधिक लेखनपद्धति, त्यांचे 'काळांतील निवडक निबंध' यांत आढळून येईल. अ० ब० कोल्हटकर यांचे ' संदेश ' वर्तमान-पत्रांतील चुरचुरीत लेख, यांची सर आतां कोणास येणार नाहीं. अण्णासाहेब किर्लोस्कर, देवल, वासुदेवशास्त्री खरे, श्री० कृ० कोल्हटकर, गडकरी, ह्यांचीं भाषेच्या दृष्टीनें अत्यन्त उत्कृष्ट अशीं नाटकें आहेत. साने, राजवाडे, वि० ल० भावे, पारसनीस, यांचें ऐतिहासिक संशोधनात्मक लिखाण मोलाचें आहे. श्री० कृ० कोल्हटकर व गडकरी, यांनी विनोद, कोट्या, इ० वर अधिक भर दिलेला आहे.

## [ सन १९०० ते चालू ]

विद्यमान परंतु जुन्या पिढीच्या लेखकांत चिंतामण विनायक वैद्य यांची बरोबरी करणारा लेखक आज उरला नाहीं. महाभारताचें सूक्ष्म अवलोकन, त्यांतील उल्लेखांवरून प्राचीन संस्कृतीच्या काळासंबंधानें निघणारीं अनुमानें, पूर्व–इतिहासाविषयीं संशोधन, व्युत्पत्तिशास्त्रासंबंधानें विचारशुद्ध तर्कपद्धति, हीं यांच्या अनेक इंग्रजी व मराठी ग्रंथांतील लेखनांत आढळून येतात. अगदीं आज केळकर यांची अष्टपैलू लेखक म्हणून प्रसिद्धि आहे. लहान–मोठे ग्रंथ, निबंध, नाटकें, स्फुटविषय, लघुकथा, काव्य व नुकतीच लिहिलेली 'नवलपूरचा संस्थानिक' ही कादंबरी, इ० सर्व साहित्यांगांमध्यें त्यांचें लेखन आहे; आणि जें आहे तें विचार, अनुभव, अभ्यास व भाषेची ठाकठिकी ह्या सर्वांनीं परिपूर्ण असल्यामुळें विद्यमान लेखकांत तरी ते अग्रगण्य आहेत, यांत शंका नाहीं. यांशिवाय

ल० रा० पांगारकर, यशस्वी वर्तमानपत्रकार व नाटककार खाडिलकर, प्रो० वामन मल्हार जोशी, प्रो० चाफेकर, ना० गो० चाफेकर, प्रो० ना० सि० फडके, खांडेकर, सावरकर, बेहरे, वरेरकर, मटे, शिंदे, लठ्ठे, घाटे, भास्करराव जाधव, इतिहाससंशोधक पोतदार, सरदेसाई, कॅ० मोडक, ज० शिंदे, य० खु० देशपांडे, यादवराव काळे, यांचीं नांवें वगळून चालावयाचें नाहीं. गिरिजाबाई केळकर, रमाबाई रानडे, काशीबाई कानिटकर, या स्त्री-लेखिकांशिवाय सौ० टिळक, आमच्या संस्थेतील बाळूताई व कृष्णाताई खरे, ( विभावरी शिरूरकर ? ) इ० स्त्रीलेखिका आतां प्रामुख्यानें पुढें येऊं लागल्या आहेत.

ह्यांशिवाय कोश, व्याकरणें, इ० विषयांच्या ग्रंथसंपत्तींतही उत्तरोत्तर चांगलीच भर पडत चालली आहे. ज्ञानकोशामुळें डॉ० श्री० व्यं० केतकर यांचें नांव टिकून राहील. गीर्वाणलघुकोश, मराठी शब्दरत्नाकर, सरस्वतीकोश, फारसी-मराठी कोश, चित्रावशास्त्रीसंपादित चरित्रकोश, दाते यांचा मराठी कोश, पुनर्मुद्रित प्राचीन व अर्वाचीन भारतवर्षीय कोश, हे प्रयत्न नांव घेण्यासारखे आहेत. दादोबांच्या मोठ्या व्याकरणानंतर दुसरा चांगला व्याकरण-ग्रंथ लौकर निपजला नाहीं. कृष्णशास्त्री गोडबोले यांचें "मराठी भाषेचें नवीन व्याकरण" १८६७ त छापलें. त्यानंतर दामले यांचें " शास्त्रीय मराठी व्याकरण " १९११ त छापलें गेलें. त्याला मागें सारील असा दुसरा मराठी व्याकरण-ग्रंथ अजून झाला नाहीं. राजवाडे यांचें " ज्ञानेश्वरी मराठीचें व्याकरण, " आणि "सुबन्तविचार" व " तिङन्तविचार " ह्या दामल्यांचे व्याकरणावरील राजवाडे यांच्या टीका छोट्या पण मोठ्या योग्यतेच्या आहेत. आगरकर यांचें " वाक्य-मीमांसा " हें पुस्तक त्या विषयाचे बाबतींत उत्कृष्ट आहे. कृ० पां० कुळकर्णी यांचें ' मराठी भाषा उद्गम व विकास, रा० मोडक यांचे व्युत्पत्तिविषयक लेख व पावशे यांचे शुद्धलेखनविषयक लेख, वि० रा० शिंदे यांचे भाषाविषयक लेख हे प्रयत्न नांवाजण्यासारखे आहेत.

ह्यांशिवाय लघुकथा, विडंबन-काव्य, लोक-कथा, लोक-गीतें, काहण्या, ओव्या, नाट्य-छटा, इ० चें प्रकाशन सुरू होऊन मराठीची सर्वांगीण प्रगति होत आहे. आधुनिक भौतिक शास्त्रीय वाङ्मयांत मात्र पडावी तितकी भर अजूनही पडत नाहीं, हें खरें असलें तरी एकंदरींत भावी उत्कर्षाचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं.

आतां ह्या कालांतीलही भाषा-वैशिष्ट्याचे निदर्शक असे कांहीं उतारे विषय-पूर्ततेसाठीं देतों.

## नरसिंह चिंतामण केळकर

### जुने पंडित

" जुने पंडित हे खरोखरच चालते बोलते ग्रंथ असत. त्यांचें विषयनिष्णातत्व व पाठांतर हीं पाहून अलीकडच्या काळांतील मनुष्य थक्कच होऊन जावयाचा ! ...... या एकदेशीय पंडितांच्या पदरीं शहाणपण पुष्कळ असे खरें, पण तें सगळें मोहरा-पुतळ्या किंवा बंदे रुपये यांच्या रूपानें; त्यांच्याजवळ परचुरण नाहीं आणि दुकानदारास तर त्यांची मोहोर घेऊन खपावयाची नाहीं; व पचायचीही नाहीं. यामुळें पदरीं द्रव्य व व्यवहाराच्या बाजारांत पदार्थ मांडलेले असतां भाजीही घेतल्याशिवाय हात हालवीत परत यावें लागणार ! बरें, भाजी मिळालीच तर अंगापासून केव्हांही दूर न होणाऱ्या जरीकाठी शालजोडीच्या पदरांत बांधून शास्त्रीबोवा ती घरीं आणणार ! "

## प्रो० वामन मल्हार जोशी

### देशाभिमानाचा मक्ता एकाच पक्षास नाहीं.

" सामाजिक सुधारकानें राजकीय सुधारकास पाण्यांत कां पहावें, तें समजत नाहीं. ...... आपलें हें आर्यावर्तरूपी राष्ट्रशरीर केवढें अवाढव्य, आणि त्याला कितीक तरी रोग आहेत ! आर्यावर्ताला त्रिदोष नव्हे तर शतदोष झाला आहे. व्यापार नाहीं, पैसे नाहींत, खाण्यापिण्यास पुरेसें नाहीं, देशान्तरीं जाण्याची उमेद नाहीं व त्याला अवसर नाहीं, देशांतल्या देशांत मान नाहीं, मानहानि पुष्कळ वर्षे होत गेल्यामुळें तेजही कमी झालेलें, नीतिधैर्य बेताचेंच, धर्माचा उत्साह तात्पुरताच, विद्येची आवड परंपरागत, पण तीही अवसर नसल्यामुळें मंदावलेली, ......सर्व गोष्टींत परावलंबित्व, उष्टें खाण्याशिवाय गत्यन्तर नाहीं, स्त्रिया अशिक्षित आणि कोत्या दृष्टीच्या—म्हणजे अर्धांग विगलित झालेलें, शूद्रादि वर्गांना पायाचा दाखला दिला तर हे पाय कमजोर झालेले आणि पोटाशीं व डोक्याशीं भांडण्यास तयार झालेले, बाहु लुले, डोकें गांगरून गेलेलें ! बरें, परिस्थिति अशी कीं स्वतःला जें औषध घ्यावेसें वाटतें तें

पराधीनतेमुळें घेण्याची सोय नाहीं...... अशा परावलंबी शरीराला कोणतें औषध किती प्रमाणांत द्यावयाचें हें मलाच तेवढें समजतें, दुसऱ्या कोणाला समजत नाहीं, हें म्हणणें किती धाडसाचें आहे ? " ( विचारविलास ).

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

वर्तमानपत्रकर्ता

" पंधरा वर्षांपूर्वी मीं आपल्या गांवीं एक मिठाईचें दुकान काढलें. तें काढण्याचा उद्देश केवळ स्वार्थ साधण्याचा नसून, तरुण पिढीचें लक्ष व्यापारधंद्याकडे वळवावें हा होता...... हळू हळू माझ्या दुकानाची विक्री इतकी वाढूं लागली कीं, पुडे बांधण्यास रद्दी कागद मिळण्याची पंचाईत पडूं लागली. तिच्यामुळेंच वर्तमानपत्र काढण्याचा विचार प्रथमतः माझ्या मनांत आला. शेवटीं वर्तमानपत्रांत मला फारशी प्राप्ति झाली नाहीं, तरी त्यांत मला माझ्या मिठाईच्या दुकानाची जाहिरात देतां येईल, वर्तमानपत्राचे अंक पुडे बांधण्यास उपयोगी पडतील, व अशा प्रकारें एका कामांत दोन कामें साधतील, असा विचार मीं केला व तो अमलांतही आणिला. एकंदर धंद्यांचा सूक्ष्मपणें विचार केल्यास आपणांस त्यापैकीं बरेच जोड-धंदे आढळून येतील. येथें जोड-धंदा याचा अर्थ जोड्यांचा किंवा चांभाराचा धंदा असा न घेतां धंद्यांची जोडी असा घ्यावयाचा."
(सुदाम्याचे पोहे).

वरीलपैकीं केळकर यांच्या उताऱ्यांत अनेक गुण दिसून येतील. त्यांच्या एकंदर लिखाणांत अष्टपैलूपणा, विषयाचें सांगोपांग ज्ञान, तपशीलवार वर्णनाची हातोटी, प्रमाणशीर व आकर्षक विनोद, प्रसंगानुरूप भाषा, अलंकारप्रचुरता, विविधता, चातुर्य, कोटिबाजपणा, इ० गोष्टी यथास्थितपणें आढळून येतात. त्याचप्रमाणें प्रो० वा० म० जोशी यांच्या भाषेंतही संस्कृतप्रचुर शब्दयोजना, मुद्दाम केलेल्या कोट्या, तर्कावर आधारलेलें पांडित्य, योग्य स्थलीं साभिप्राय अशींच विशेषणें, कांटेतोलपणा, इ० गोष्टी आढळतात. श्री० कृ० कोल्हटकर यांना आधुनिक विनोदी वाङ्मयाचे जनक समजतात. त्यांच्या वरील लहानशा उताऱ्यावरूनही त्यांच्या भाषेंतील वैशिष्ट्य सहज कळून येईल.

\+ + + +

सन १८७४ ते आतांपर्यंतच्या कवि-मंडळांत साधारणतः दोन गट आढळून येतील. एक जुन्या संस्कृती वळणाचे कवि व दुसरे नवीन इंग्रजी वळणाचे

कवि. जुन्या वळणाच्या कवींचीं वृत्तें सामान्यतः जुनींच, ह्यामुळें त्या कवितेला वामन, मोरोपंत, यांच्याप्रमाणें वळण लागलेलें आढळतें. नव्या कवितेंत चाली निराळ्या, विषय निराळे, त्यांमुळें ह्या कवितेची धाटणी निराळ्या प्रकारची बनली आहे. महाजनि, पाळंदे, वि० कों० ओक, मोगरे, कानिटकर, आठल्ये, चिंतामणि पेठकर, खरे, बा० अ० भिडे, वि० वा० भिडे, कृ० पां० लिमये, इ० मंडळींच्या कविता जुन्या वळणाच्या आहेत. केशवसुत, टिळक, लेंभे, Bee, घाटे, माधवानुज, ठोमरे, रेंदाळकर, गोविंदाग्रज, तांबे, माधव-जूलियन, यशवंत, गिरीश, वनमाली, ह० स० गोखले, केशवकुमार, कमलाबाई देशपांडे, मध्यप्रांतीय आनंदराव टेकाडे, कविभूषण खापर्डे, देशपांडे मंडळी, इ० कवींच्या कविता नवीन वळणाच्या आहेत.

आतां कांहीं आधुनिक पद्यांतील उतारे देऊन हें प्रकरण संपवूं.

## केशवकुमार

"आम्ही कोण ?"

'आम्ही कोण' म्हणून काय पुसतां दांताड वेंगाडुनी ?
फोटो मासिक पुस्तकांत न तुम्हीं कां आमुचा पाहिला ?
किंवा 'गुच्छ,' 'तरंग,' 'अंजलि,' कसा अद्यापि ना वाचिला ?
चाले ज्यावरतीं अखंड स्तुतिचा वर्षाव पत्रांतुनी —
ते आम्ही परवाङ्मयांतिल करूं चोरून भाषान्तरें,
ते आम्ही न कुणास देउं अगदीं याचा सुगावा परी
डोळ्यांदेखत घालुनी दरवडा आम्ही कुबेरावरी
त्याचें वाग्धन वापरून लपवूं हीं आमचीं लक्तरें !
काव्याची भरगच्च घेउनि सदा काखोटिला पोतडी
दावूं गाउनि आमुच्याच कविता आम्हीच रस्त्यामधें,
दोस्तांचे घट बैसवून करुं या आम्ही तयांचा 'उदे'
दुष्मानावर एकजात तुटुनी कीं लोंबवूं चामडीं,
आम्हांला वगळा—गतप्रभ झणीं होतील साप्ताहिकें !
आम्हांला वगळा—खलास सगळीं होतील ना मासिकें !

( झेंडूचीं फुलें )

## विठ्ठल भगवंत लेंभे

विष्णु—निधन ( विष्णूशास्त्री चिपळूणकर यांविषयीं शोकोद्गार )

“ माले, ” तुझा बहुत घात खराचि झाला ।
दैवें तुझा जनक नाक-पथासि नेला ! ॥
‘ अर्पील जो मज करें विबुधोत्तमासी ’ ।
होती अशी बहुत आस तुझ्या जिवाची ॥ १ ॥
श्रृंगार-वीरनव-लेख अतां कशाचे ? ।
येईल मात्र भरतें करुणारसाचें ॥
गंभीर धीर रस-पूरित वाग्विलास ।
गेला लया तव पित्यासह आजि खास ॥ २ ॥
ज्यांच्या गुणीं मुदित पंडित सर्व झाले ।
गर्वोद्धतांसहि जिहीं मदहीन केलें ॥
सर्वत्र ज्यांस जयपत्र मिळेच जाण
ऐसे अतां लिहिल निःस्पृह लेख कोण ? ॥ ३ ॥

## प्रो० माधव त्रिंबक पटवर्धन

आमची मायबोली

मराठी असे आमची मायबोली जरी आज ती राजभाषा नसे ।
नसो आज ऐश्वर्य या माउलीला यशाची पुढें थोर आशा असे ॥
न मातब्बरी पञ्चखण्डान्तरीं ती जरी मान्यता पावली इंग्रजी ।
भिकारीण आई जहाली म्हणूनी कुशीचा तिच्या तीस केवीं त्यजी
मराठी असे आमची मायबोली जरी भिन्नधर्मानुयायी असूं ।
सहिष्णुत्व अंगीं पुरें बाणलेलें, हिच्या एक ताटांत आम्ही बसूं ॥
हिचे पुत्र आम्ही हिचे पांग फेडूं वसे आमच्या मात्र हृन्मंदिरीं ।
जगन्मान्यता हीस अर्पूं प्रतापें हिला बैसवूं वैभवाच्या शिरीं ॥
करंटी दरिद्री नसे जन्मतां ही हिची थोर सम्पत्ति कालोदरीं ।
पचेना उपेक्षेमुळें राहिलेली झणीं तीस बाहेर काढूं तरी ॥
कशाला हवी लूट ? देतील भाषा जगाच्या हिला वाढती खंडणी
मराठी असे आमची मायबोली ! मराठे झिजूं या हिच्याकारणीं ॥

## दत्तात्रेय कोंडो घाटे

शहाणी बाहुली

या बाइ या, बघा बघा कशि माझि रुसालि बया।
ऐकुं न येतें, हलु हलु अशि माझि छबि बोलते।
डोळे फिर्विते, टुलु टुलु कशि माझि सोनि चालते।
बघा बघा तें, गुलु गुलु गालांतच कशि हासते।
मला वाटतें, इला बाइ सारें कांहिं सारें कळतें।
सदा खेळते, कधि हट धरुन न मागे भलतें।
शहाणि कशी, साडी-चोळि नवि ठेवि जशिच्या तशी।

## प्रो० वासुदेव गोविंद मायदेव

'जगीं गरिबांचें नाहिं कुणी वाली'

कुंद ओल्या खालतीं पटकुरांत।
बाळ गोपाळ प्रभा झोंप घेत॥
मात्र माता जागते जशी ज्योत।
हलुनि अंधारीं मनस्तरंगांत॥ १॥

दिवस तीचे तोंडास लपविण्याचे।
दिवस कष्टानें घास आणण्याचे॥
दिवस निःशब्दें अश्रु गाळण्याचे।
पिलां पाहोनी जीव कंठण्याचे॥ २॥
दिवस प्लेगाचे दिवस औषधाचे।
दिवस पैशाचे दिवस डॉक्टरांचे॥
दिवस थोरांचे दिवस वकीलांचे।
दिवस गरिबांचे स्वर्ग साधण्याचे॥ ३॥
...नको जाऊं अपराध्र कोण आई।
दूर घर तें; मी मरत खास नाहीं॥
कुठुनि पैसे देशील डॉक्टरांचे?।
अगे, कोणीही नव्हत गरीबांचे॥ ४॥

...म्हणे डॉक्टर ‘ घेईन वीस बाई ’।
एकदांची मोटार ऐकुं येई ॥
परी तत्पूर्वी बाळ त्यजुनि गेली !
‘ जगीं गरिबांचें नाहिं कुणी वाली ’ ॥ ५ ॥

## डॉ० कमलाबाई देशपांडे

जीवित–कोडें

या जीवाला जीवित–कोडें जन्मान्तरिं तरि सुटेल का ?
ही जीवाची हुरहुर जाची काज तियेचें कळेल का ?
कांक्षित हृदया मिळोनि, चित्ता ठाव तयाचा दिसेल का ?
जी जीवाला जाणिव झाली उदित खरी ती उरेल का ?
जीव धावतो त्या सौख्याचें स्थान अचल तें दिसेल का ?
या जीवाची तळमळ साची पूर्णानंदीं विरेल का ?
– पूर्णानंदी आशावादी हृदय कधीं हें बनेल का ?
या जीवाला जीवित-कोडें जन्मान्तरिं तरि सुटेल का ?

## यशवंत दिनकर पेंढारकर

पाणपोई

येइ भाई येथ पाही। घातली ही पाणपोई ॥
धर्म–जाती कोणती ती। भेद ऐसा येथ नाहीं ॥
संसृतीचा हा उन्हाळा। तल्खली होई जिवाची ॥
स्वेद–बिंदू अश्रु–धारा। यांविना पाणीच नाहीं ॥ १ ॥
वायु–वीची भोवतीं आन्दोलुनी त्या वञ्चिताती ॥
झोम्बती अङ्गीं झळा अन्। मूर्च्छना ये ठायिं ठायीं ॥
साउली नाहीं कुठेंही। तापतो मार्तण्ड डोई ॥
श्रान्त पान्था ! बान्धली ही। तूझियासाठीं सराई ॥ २ ॥
ओन्जळी दो ओन्जळी आ–कण्ठ किंवा घे पिऊनी ॥
हो जरा ताजा तवाना। येउं दे सामर्थ्य पायीं ॥
पावतां तृप्ती मना सन्–चारतां अङ्गीं उमेदी ॥
जो दुवा देशील पान्था। तेवढी माझी कमाई ॥ ३ ॥

## श्रीपाद कृष्ण कोल्हटकर

महाराष्ट्र—गीत

**बहु असोत सुंदर संपन्न कीं महा—**
**प्रिय अमुचा एक महाराष्ट्र-देश हा ॥ ध्रु० ॥**
**विक्रम वैराग्य एक जागिं नांदती।**
**जरिपटका भगवा झेंडाहि डोलती ॥**
**धर्म राजकारण समवेत चालती।**
**शक्ति युक्ति एकवटुनि कार्य साधिती ॥**
**पसरे यत्कीर्ति अशी विस्मयावहा— ॥ प्रिय० ॥**

आधुनिक कवितेचे अनेक मासले देतां येणें ह्या चिमुकल्या लेखांत अशक्य आहे. ज्ञानेश्वरापासून पेशवाईच्या अखेरपर्यंत मराठी पद्याचे विषय वेदान्त, भक्ति, नीति व पुराण–कथावर्णन हे होते. आरंभीचे मराठी छंद ओवी व अभंग हे होते; त्यानंतर वामन, रघुनाथपंडित, आनंदतनय, पुढें मोरोपंत, विठ्ठल कवि, यांनीं निरनिराळी श्लोकबद्ध मराठी पद्य–रचना केली; परंतु विषय वरचेच होते. पेशवाईच्या अखेरीस रामजोशी, अनंतफंदी, इ० कवींनीं वीररसात्मक पोवाडे व शृंगारात्मक लावण्या अशा प्रकारची पद्यरचना केली. पेशवाईच्या अखेरी-नंतर व अव्वल इंग्रजी सुरू झाल्यावर मध्यन्तरीं कांहीं काल चांगली काव्यरचना आढळून येत नाहीं. पुढें शास्त्रीमंडळींच्या युगांत मराठींत विविध विषयांवर परंतु संस्कृती थाटाची आणि श्लोकवृत्तात्मक अशी कांहीं पद्यरचना झाली. ह्या कालांत संस्कृत-शब्द-प्रचुर कठीण पद्यरचना व तिच्या विरुद्ध शुद्ध व साधी, सोपी अशी पद्यरचना, यांत चांगली कोणती याबद्दल विद्वानांत चर्चा चालू होती.

हा काल संपल्यावर आधुनिक काव्याचा जन्म झाला. आधुनिक काव्याचे जनक "केशवसुत' हे समजतात. केशवसुतांनीं विविध प्रचलित विषयांवर, समाजाला खळबळून सोडणाऱ्या अशा जोरदार भाषेंत निर्भीड वृत्तीनें आणि रेखींव श्लोकवृत्तात्मक चालींशिवाय इतर प्रकारच्या वृत्तांतही पद्यरचना करण्याची प्रथा पाडिली. साधारणपणें आधुनिक कवींनीं तिचाच स्वीकार केला आहे; आणि त्यांत आणखी निरनिराळ्या गोष्टींची भरच पडत आहे. केशवसुतांनीं "आम्ही कोण म्हणूनि काय पुसतां ? आम्ही असों लाडके; देवाचे" अशी गर्जना करून,

वेदान्त, भक्ति, पुराणकथा, यांवरच कविता करणारे ते खरे कवि व जगांतील अनंत सृष्ट वस्तु व इतर दृश्यें यांवर कविता करणारे ते कवि नव्हेत, असा भ्रम होता आपल्या जोमदार काव्यांनीं जनतेंतून काढून टाकिला. त्याच्या पुढच्या बऱ्याच कवींच्या कृतीही अशाच सोज्वळ आहेत. अयोग्य रूढींचीं बंधनें तोडण्यासाठीं केशवसुतांनीं 'तुतारी' फुंकली, तिचेंच अनुकरण आधुनिक इतर कवींनीं केलें. विषयांप्रमाणेंच चालींची विविधता आजच्या पद्यरचनेंत आढळून येते. नवीन जाति-वृत्तें ह्या कवींनीं निर्माण केलीं आणि त्यांना आतां छन्दःशास्त्रांत स्थान देणें अवश्य झालें आहे. आधुनिक कवींत रेव्हरेंड टिळक यांची कविता गांभीर्य, उदात्त कल्पना, शुद्धता, यांनीं युक्त अशी आहे. "माझ्या जन्मभूमीचें नांव" इ० त्यांच्या कविता देशाभिमानप्रेरकही आहेत. बालकवि व इतर कांहीं कवि सृष्टिवर्णनपर, अत्यन्त सोप्या भाषेंत व कर्णमधुर चालींत पद्यरचना करणारे झाले आहेत. रेंदाळकरांनीं निर्यमक कवितेचें प्रथम शिंग फुंकलें; त्यानंतर सयमक व निर्यमक कवितेची चर्चा आतां संपुष्टांत येऊन, सुंदर कल्पनायुक्त निर्यमक कवितेलाही कोणी नाक मुरडीनासें झालें आहे. 'माधव-जूलिअन' या कवींनीं व याच्या संप्रदयानें 'अन्' चा प्रचार, अनुस्वाराबद्दल परसवर्ण अनुनासिक लिहिण्याची पद्धति, हीं बेधडक सुरू केलीं आहेत; व मध्येंच आल्यानें कर्णकटु वाटणारे यवनी शब्दही मराठीची शब्दसंपत्ति वाढविण्यासाठीं तसेच घुसडण्याची दांडगाई किंवा बंडावा मांडिला आहे. (या मध्येंच येणाऱ्या यवनी शब्दांबद्दलचें आपलें मत बदलल्याचें नुकतेंच माधव-जूलिअन यांनीं जाहीर केलें आहे) यांच्या कवितेंत भर्जरी, तल्खली, तर्वार, मख्मली, असे शब्द बरेच आढळतात. पञ्च-खण्डान्तरीं, इङ्ग्रजी, खण्डणी, ह्याप्रमाणें अनुस्वारांऐवजीं सवर्ण व्यंजनें आढळतात. यशवन्त, गिरीश, मायदेव, अत्रे, सोपानदेव चौधरी, इ० विद्यमान कवींनीं आपल्या कविता ठसकेबाजपणानें व साभिनय गाऊन, चांगला लौकिक संपादिलेला आहे. मायदेव वगैरे कांहींच्या कविता विशेषतः मुलांसंबंधानें, तर अत्रे वगैरेंच्या कविता विडंबनात्मक आहेत. आधुनिक पद्याचें स्वरूप ह्याप्रमाणें विविधांगी व मनोहर असेंच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

या मर्यादित विषयाच्या ग्रंथांत महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्र यांतील कितीतरी उत्कृष्ट लेखक व कवि यांचा नुसता नामनिर्देशही करितां आला नाहीं, याची लेखकास जाणीव आहे.

## प्रांतिक मराठीचें स्थूल स्वरूप

| | पुणेरी | कोंकणी | चित्पावनी | वऱ्हाडी | नागपुरी | खानदेशी | कारवारी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | तुझें नांव काय ? | तुजं नांव कित्तें ? | तुझँ नावँ कितँ ? | तुह नॉव काय हाय ? | तुझा नाव का आहे ? | तुन्हा नाव काय आहस ? | तुनले नॉवॅ इत्तँ ? |
| २ | त्याचा भाऊ त्याच्या बहिणीपेक्षां उंच आहे. | तांचों भाव ताच्या बइणी-बोर्न उबार आसा. | तेचो भाऊस तेच्या बेहणी-पेक्षां उंच से. | त्याचा भाऊ त्याच्या बहिणीहून उंच आहे. | त्याचा भाऊ त्याच्या बहिणीहून उंच आहे. | तेना भाई तेने वहीनस ऊंच स. | नागेलो भावु नागेल्या बहिणीपेक्षां ळांब आस्स. |
| ३ | त्याची किंमत अडीच रुपये आहे. | तार्चे मोल अडीच रुपोइ आसा. | तेची किंमत अडीच रुपये पे. | त्याच मोल अडीच रुपये आहे. | त्याची किंमत अडीच रुपये आहे. | तेने किमत अडीच रुपया स. | नाझे मोल अडेच रुपये. |
| ४ | माझा बाप त्या लहान घरांत राहतो. | माझो बापुइ त्या धाकटया घरी आसा. | माझो बापुस ने धाकटे घरांत रहिचे. | माहा बाप त्या ल्हान्या घरांत राहते. | माझा बाप त्या लहानशा घरांत राहते. | मना बाप धाकले घरमे रहना. | नागेलो बापुसु त्या सानाँ घरांतु रावता. |
| ५ | माझ्या पुढें चाल. | मोज्या मुकार चाल | माझें पुढँ चाल | माह्या सामने चाल. | माझ्या सामने चाल | मन मोरे चाल. | मज्जेइदूर चंक. |

( म० भा० उ० वि० पृष्ठ २८७ वरून )

## प्रांतिक मराठी

'दर बारा कोसांवर भाषा बदलते' असे भाषेसंबंधानें म्हणतात, तें खरेंच आहे; कारण आपल्या एकाच मराठीचीं नागपुरी, माळवी, वऱ्हाडी, खानदेशी, बडोदी, पुणेरी, कोल्हापुरी, सातारी, कर्नाटकी, कोंकणी, चित्पावनी, अशीं भिन्न भिन्न स्वरूपें आढळतात. त्याचप्रमाणें पुरुष-स्त्रिया-मुलें, नागर-खेडवळ, अधिकारी व दास, भिन्न भिन्न जाति, यांमुळें असंख्य प्रकार होतील ते निराळेच. त्या सर्वांसंबंधानें थोडी-फार कल्पना प्रत्येकास असतेच; म्हणून येथें ज्यास्त न लिहितां, मराठीच्या मुख्य उपभाषांचें स्थूल स्वरूप कळण्यासाठीं त्या भाषांतील एकेक वाक्य पृष्ठ ५३ मधील कोष्टकांत दिलें आहे. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत सध्यां चालू असणाऱ्या भाषांचा व मराठीचे निरनिराळे प्रकार कोठें चालतात तें दर्शविणारा, असे दोन नकाशेही पुढील पानांत जोडिले आहेत.

सन १९३१ च्या खानेसुमारीवरून महाराष्ट्र, नागपूर, वऱ्हाड, माळवा, बडोदें, निजामचे मराठी जिल्हे, कर्नाटक, कोंकण व गोवा, ह्या सर्व ठिकाणच्या मराठी भाषा बोलणारांची संख्या सुमारें दोन कोटि पंधरा लक्ष आहे.

---

# मराठी भाषा
## प्रांतिक भेद

गुजराती
नेमाडी
राजस्तानी
पश्चिम हिंदी
सिवनी
बेतूल
पूर्व हिंदी
सातपुडा पर्वत
खानदेशी (अहिराणी)
गाविलगड
नागपुरी
नागपूर
गोंड
अमरावती
बुलढाणा
अकोला
वर्धा
यवतमाळ
वाशीम
चांदा
वैरागड
तेलगु
माहूर
पैनगंगा नदी
दमण
उ. कोंकणी
नासिक
औरंगाबाद
पैठण
वसई
मुंबई
ठाणा
अहमदनगर
बीड
देगलूर
तेलगु
पुणें
बार्शी
जंजिरा
बेदर
सातारा
पंढरपूर
सोलापूर
अक्कलकोट
विजापूर
रत्नागिरी
सांगली
कोल्हापूर
कोंकणी चित्पावनी कुडाळी गोमांतकी
कानडी
कानडी
गोवा
पणजी
कारवार
कारवारी

# मराठी
# व
# इतर भारतीय भाषा.

काश्मीरी
पुस्तु
बलोच
बलोच
ब्राहुइ
मक्राणी
पंजाबी
पश्चिम पहाडी. मध्य पहाडी. पूर्व पहाडी.
हिंदुस्तानी
ग्वाल्हेर
व्रज
राजस्तानी
माळवी
धार
गुजराती
बडोदा
इंदूर
बुंदेली
बघेली
मैथिली
बिहारी
मगधी
आसामी
बंगाली
नागपूर
उरिया
मराठी
मुंबई
पुणे
रत्नागिरी
सोलापूर
हैद्राबाद
हुबळी
म्हैसूर
तंजावर
कोचीन

# काव्य-विचार

## काव्य-लक्षण

प्रतिभानिर्मित व कल्पनारम्य अशी जी सुंदर वाक्यरचना तिला **काव्य** असें म्हणतात.

(१) "वाक्यं रसात्मकम् काव्यम्," (२) "रमणीयार्थ-प्रतिपादकः शब्दः काव्यम्,"(३) "गुणालंकार-सहितौ शब्दार्थौ दोष-वर्जितौ" (४) "काव्यस्यात्मा ध्वनिः"(५) "भावनोद्दीपकः शब्दः काव्यम्," इ० काव्याच्या पुष्कळ व्याख्या निरनिराळ्या ठिकाणीं केलेल्या आहेत; त्या सर्वांचा मथितार्थ असा कीं, काव्यांत प्रतिभा, आल्हादजनकत्व; रसोत्पत्ति; ओज, माधुर्य, प्रसाद, इ० गुण; अलंकार; भाषा-प्रौढता व सुबोधता; शब्दार्थदोषरहितता (निर्दोषत्व); शब्द-चमत्कृती-पेक्षां अर्थ-चमत्कृतीचें प्राधान्य; इ० गोष्टी असाव्यात.

बालकवींच्या 'फुलराणी' ह्या कवितेंतील खालील उताऱ्यावरूनही ह्या गोष्टीची नीट स्पष्टता होईल. फुलराणी व रविकर यांच्या विवाहाचें वर्णन—

**तेजोमय नभ--मंडप केला। लक्ख पांढरा दहा दिशांला।**
**जिकडे तिकडे उधळित मोतीं। दिव्य वऱ्हाडी गगनीं येती।**
**लाल सुवर्णी झगे घालुनी। हांसत हांसत आले कोणी।**
**कुणीं बांधिला गुलाबि फेटा। झकमकणारा सुंदर मोठा।**
**आकाशीं चंडोल चालला। हा वाङ्निश्चय करावयाला।**
**हें थाटाचें लग्न कुणाचें?। साध्या भोळ्या फुलराणीचें।**

* * * *

**गाउं लागले मंगलपाठ। सृष्टीचे गाणारे भाट।**
**वाजवि सनई मारुत-राणा। कोकिळ घे तानांवर ताना।**
**गाउं लागले भारद्वाज। वाजविती निर्झर पखवाज।**
**नवर-देव सोनेरी रवि-कर। नवरी ही फुलराणी सुन्दर।**
**लग्न लागतें, सावध व्हारे। सावध पक्षी, सावध वारे।**
**दंवमय हा अन्तःपट फिटला। भेटे रवि-कर फुलराणीला।**

* * * *

**वधू-वरांना दिव्य रवांनीं। कुणीं गाइलीं मंगल गाणीं।**
**त्यांत कुणीसें गुंफित होतें। परस्परांचें प्रेम अहा तें।**

**आणिक तेथील वनदेवीही । दिव्य आपुल्या उच्छ्वासांहीं ।**
**लिहीत होत्या वातावरणीं । फुलराणीची गोड कहाणी ।**
**गुंगत गुंगत कवि त्या ठायीं । स्फूर्तीसह विहराया जाई ।**
**त्यानें तर अभिषेकच केला । नव-गीतांनीं फुलराणीला ।**

नीट कल्पना येण्यासाठीं हा एवढा उतारा दिला आहे; त्यावरून कवीला एक फुलराणीचें फूल दिसलें तें काय, आणि तेवढ्यावरून त्यानें आपल्या कल्पना-निर्मितीनें परिस्थितीचा त्याच्याशीं संबंध जुळवून, रविकिरणाशीं त्या फुलराणीचें लग्न लावून दिलें तें काय ! त्याला वऱ्हाड्यांची पंचाईत पडली नाहीं, मौल्यवान् कपड्यालत्त्यांची कमतरता भासली नाहीं, वाङ्निश्चयाला कोण उभा करावा याची फिकीर पडली नाहीं; त्यानें साध्या भोळ्या फुलराणीचें सुंदर छबुकड्या रवि-किरणाशीं, मोठ्या थाटानें सृष्टीच्या भाटांकडून मंगलपाठ म्हणवून, मारुत-राण्याला सनई वाजवायला लावून, कोकिळाला गावयाला लावून, भारद्वाजाकडे नर्तन सोंपवून, निर्झरांना पखवाजी बनवून, 'सावधान' 'सावधान' असें मोठ्यानें म्हणत असतां, दवमय अंतःपट बाजूला सारून, लग्न लावून दिलें; आणि शेवटीं आपण स्वतः स्फूर्तीसह तेथें गुंगत गुंगत येऊन, त्यांच्यावर त्यानें नव-गीतांचा जणूं अभिषेकच केला !

किती सुन्दर कल्पना ! उसन्या नसून स्वयं-प्रतिभा-निर्मित ! अशा रचनेला **काव्य** म्हणतात; एवढें येथें स्पष्टीकरण पुरे.

काव्य पद्यांतच असतें असें नसून, गद्यांतही त्याचीं विपुल उदाहरणें सांपडतील; परंतु येथें ज्यास्त जागा नसल्यामुळें, पद्यांतीलच उदाहरणें दिलीं आहेत.

## काव्य-गुण

**प्रसाद, माधुर्य** व **ओज** असे काव्याचे मुख्य तीन गुण आहेत.

१. सहज अर्थप्रतीति होईल अशी शब्द-योजना ज्या रचनेंत असते, तिला **प्रसाद** असें म्हणतात. ( अर्थबोध सहज झाल्यानें मन त्या त्या वृत्तींनीं भरून जातें. तसेंच या रचनेंत समास क्वचितच असतात, व असल्यास तेही अगदीं लहान असेच असतात. ) उदा०—

(१) सत्यभामा व द्रौपदी यांचें संभाषण—

**सत्या कृष्णेसि म्हणे, " वदतें तें तूं खरेंच मान सये ।**
**लोक म्हणोत परि पळहि, माझ्या हातीं न कांत-मानस ये" ॥**

कृष्णा हांसोनि म्हणे, " भामे, मोहावयासि पतिला जे।
मंत्राद्युपाय करणें, या श्रवणें बहु मदीय मति लाजे॥
प्रेमें पति-चरणांसि न, देउनि दे हात तायिताला जे।
ते स्त्री न रुचे पतिला, कीं तीतें आततायिता लाजे"॥(मोरोपंत)

(२) या बाइ या—बकुळिच्या झाडाखालिं फुलें वेंचुं या।
उन पडलें—पान फुल दिसे कसें गोड गोडुलें।
गोड गोडुले—मोतियाचे दाणे कोणिं खालिं पाडिले।
रानि हाललें—पहाटेला शुक्र-देव गाणें बोलले॥ (बालकवि)

२. ज्या रचनेच्या योगानें चित्तवृत्ति तल्लीन होते, ज्यांतील विशेषतः कोमल व मधुर वर्णांच्या रचनेमुळें नाद उत्पन्न होऊन, तें गुणगुणावेंसें वाटतें, अशा प्रकारच्या रचनेला **माधुर्य** असें म्हणतात. या रचनेंतही समास क्वचितच असतात; आणि केव्हां केव्हां गोड वाटणारी अनुप्रासात्मक रचनाही आढळते.

(१) दमयंती हंसाला धरण्याचा प्रयत्न करीत आहे तें वर्णन—

हे मंदमंद पद सुन्दर कुन्द-दन्ती।
चाले जसा मद-धुरंधर इंद्र-दन्ती॥
हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते।
निष्कंप-कंकण-करासि पुढें करीते॥ (रघु० पं०)

(२) " **उघडिं नयन रम्य उषा०**" हें रेंदाळकरांचें पद्य या गुणानें युक्त आहे; तें छन्दःशास्त्रांत पुढें आलेलें आहे, म्हणून येथें दिलें नाहीं.

३. ज्या रचनेनें अन्तःकरण उद्दीपित होतें, व जोरदारपणा उत्पन्न होतो, अशा रचनेला **ओजस्** किंवा **ओज** असें म्हणतात. दीर्घ समास, कठोर वर्णांचें आधिक्य, इ० गोष्टी यांत आढळतात. उदा०—

(१) कोठें रथ? मुशल पुरे; कवच कशाला?धनुष्य राहों द्या।
वत्सेला निज-धर्षण-कर-खल-दंडोत्सवासि पाहों द्या(मोरो०)

(२) संग्रामांत झांशीची राणी लक्ष्मीबाई—

आरक्त उषा ती गमली—आरक्त चंडिका गमली।
संतप्त भासली संध्या—संतप्त भासली काली।
संक्षुब्ध तिच्या नेत्रांत—क्रोधाची चढली लाली।

लखलखाट मार्तंडाचा ।
चकचकाट पूर्णेंदूचा ।
दाविला खेळ तेजाचा ।
रक्तानें शरिरीं न्हाली—मर्दानी झांशीवाली ॥ ( तिवारी )

## रस

" रसात्मकं काव्यम् " म्हणजे रस हा काव्याचा आत्मा आहे असें म्हणतात. कोणतीही भावना उत्कर्षाला पोंचणें ह्या गोष्टीस **रस** असें म्हणतां येईल.

शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, भयानक, बीभत्स, रौद्र व शांत हे **नव-रस** मानण्यांत येतात. कोणी कोणी भक्ति हा आणखी एक रस मानितात. ह्या प्रत्येकाची कल्पना येण्यापुरतीं उदाहरणें येथें देतों.

१. **शृंगार**--यांत विशेषेंकरून स्त्रियांचें सौंदर्य, राग, अनुराग, इ० चें वर्णन असतें. [ गोपीक्रीडा, राधाविलास, इ० मराठी कवींच्या प्रकरणांतून या रसाचीं उत्तान अशीं उदाहरणें हवीं तेवढीं सांपडतील; पण तीं देणें इष्ट नसल्यामुळें येथें दिलीं नाहींत. ]

दमयंतीचें स्वरूप--

चांपेकळीपरिसही सरलत्व नाकीं ।
जीच्या धरी अधर विद्रुम-भावना कीं ॥
भासे मनांत मज बिंबफल-भ्रमानें ।
कीं सत्य चंचु-पुट वोढविलें शुकानें ! ॥ ( रघु० पं० )

२. **वीर**—कोणत्याही प्रकारच्या धीरोदात्त व पराक्रमयुक्त वर्णनाचा यांत अन्तर्भाव होतो. उदा०—

अर्जुनाचें युद्धकौशल्य.

सूं सणणण सणणणणण, वाजति शर-निकर काय हानि-कर ।
वदले सुर-मुनि " करितो, नर-रूपें रुद्र काय हा निकर ! " ॥
शराधि शर-जलधि फुटले, कीं दैवें पाश एकदां तुटले ।
ते काळ-व्याळ करटि-घोटक-भट-भेक खावया सुटले ! ॥(मोरो०)

**३. करुण**—हृदयद्रावक अशा गोष्टींच्या वर्णनाच्या योगानें ह्या रसाची उत्पत्ति होते. उदा०—

**‘आई,’ म्हणोनि कोणी। आईस हाक मारी।**
**ती हाक येइ कानीं। मज होइ शोक-कारी!॥**
**नोहेचि हाक मातें। मारी कुणी कुठारी!।**
**‘आई,’ कुणा म्हणूं मी?। ‘आई’ घरीं न दारीं!॥**
**ही न्यूनता सुखाची। चित्ता सदा विदारी!।**
**स्वामी तिन्ही जगांचा। ‘आई’विना भिकारी!॥** (यशवंत)

**४. अद्भुत**—यांत आश्चर्यकारक असें वर्णन असतें. उदा०—

**वनासि रघुराज जाय अशि वाणि जों ऐकिली।**
**तदा भरत-माय दारिं नच मायशी फूगली॥**
**परंतु निज-पुत्र राज्य न करी असें ऐकतां।**
**तिचीं गळति कंकणादि वलयें बहू वारितां!॥**

**५. हास्य**—असंबद्ध प्रलाप, परचेष्टानुकरण, व्यंगदर्शन, इ० गोष्टींच्या योगानें या रसाची उत्पत्ति होते. उदा०—
शिमग्यांतील धुळवडीचें वर्णन—

**आणून गाढव तयावरि बैसवूनी।**
**एकास त्यास बुरणूसचि नेसवूनी॥**
**डोक्यावरी धरुनि सूपचि छत्र त्याची।**
**नेती वरात बहु गोजरिया वराची॥ १॥**

**कुंभारवाड्यांतिल ठाण-बंदा।**
**अश्वांत तो अश्व बहूत खंदा॥**
**झाडीत लाथा बहु आरडोनी।**
**ख्यां ख्यां करीतो वर ओळखोनी॥ २॥**
**पाठाड मोठें बसणार पक्का।**
**कोठें न पावे गरदींत धक्का॥**
**वाद्यें ठणाणा बहु वाजताती।**
**बुजे न घोडा जणुं भद्रजाती!॥ ३॥**

६. **भयानक**—उदा०-भीमाचें दुःशासन-रक्त-प्राशन.

**मग कंठनाळ चरचर, तो सत्य करावया बिरुद कापी।**
**मिटक्या देउनि मटमट, घटघट त्या स्वाहितासृगुदका पी॥१॥**
**...ऐसें वदोनि ओष्ठ-प्रांत जिभेनें पुनःपुन्हां चाटी।**
**अवलंबी अत्युग्रा, भीम अतृप्तद्विपारिची धाटी॥२॥**
**रिपु शूर, दूर तेथुनि तें दारुण-कर्म पाहतां पळती!।**
**किति पडती, किति दडती, किति पकांचीं धृतायुधें गळती!!**

७. **बीभत्स**—यांत किळस उत्पन्न होईल अशा प्रकारचें वर्णन असतें. एका विचित्र योग्याचें वर्णन—

**गोचर्मोबर साजुक ऐसें पांघरला उफराटें।**
**मस्तकिं मासे भारामध्यें मत्स्य भक्षितो वाटे॥**
**लक्ष मक्षिका घोंगावति वरि पोर लागती पाठीं।**
**लोकांमाजीं योगिराज तो देखुनियां निज-दृष्टीं॥१॥**

(उद्धवचिद्घन)

८. **रौद्र**—याचें भयानक रसाशीं बहुधा सान्निध्य असतें. उदा०—अश्वत्थाम्यानें पांडवांच्या शेष सैन्याचा केलेला प्रळय.

**सद्नीं शिरोनि पाहे, सुख-सुप्ता तात-घातका मत्ता॥**
**धृष्टद्युम्ना उठवी, हाणुनि नागासि गरुड सा लत्ता॥१॥**
**...पार्षत म्हणे "गुरुसुता, मजला शस्त्रेंकरोनि मारावें॥**
**पावेन वीर-लोकाप्रति, बा, शरणागतासि तारावें"॥२॥**
**द्रौणि म्हणे "मारावा शस्त्रें तो जो असेल अधमान्य॥**
**गुरुघातका, तुझा तो गुरुभक्त-जनीं असाचि वध मान्य"॥३॥**
**ऐसें वदोनि मर्मीं, हाणी तो शत्रुघात-कर टांचा॥**
**बुकलुनि मारी, चित्तीं घूक-कृत स्मरुनि घात करटांचा॥४॥**
**उग्रें कर्में रूपें, भासे तो भूत! विप्र भासेना!॥**
**केल्या त्रासें हरिच्या, दश-कंठें जेंवि विप्रभा सेना!॥५॥**

[वीर, भयानक व रौद्र हे सहचारी रस असल्यामुळें बरेच वेळां ते एकमेकांत मिसळलेले आढळतात.]

९. **शांत**—यांतच भक्ति, उदात्त, वत्सल व श्रेयान्, यांचा समावेश करितात. त्याचें एकेक उदा०—

भक्ति—

**दयाब्द वळशील तूं तरि न चातकां सेवकां।**
**उणें किमपि भाविकां उबगशील तूं देव कां ?॥**
**अनन्य-गतिका जनां निरखितांचि सोपद्रवा।**
**तुझेंचि करुणार्णवा, मन धरी उमोप द्रवा ॥१॥** (मोरो०)

उदात्त—

**ज्यांचें पात्र पवित्र पाणि-युग हें, भिक्षान्न जे भक्षिती।**
**ज्यांचें वस्त्र दिशा, जयां मल नसे, शय्या जयांची क्षिती॥**
**ज्यांला दैन्य नसे, विरक्ति-वनिता जे तीसवें नांदती।**
**ज्यांला कर्म-कलाप बांधित नसे, ते धन्य येणें रिती॥** (वामन)

वत्सल—( पुत्र-कन्या-विषयक प्रेमाचें वर्णन ).

**देखोनि दन्त-मुकुला अनिमित्त हासें।**
**तें बोबडें वच तसें परिसोनि खासें॥**
**अंकावरी बसवुनी तनया पहाती।**
**त्याच्या रजें मळति ते जगिं धन्य होती॥** (पर० तात्या)

प्रेयान्—( मित्रविषयक प्रेम ) सुदाम्याचें कृष्णगृहीं आगमन—

**श्रीरुक्मिणिच्या मंदिरिं तेव्हां होता जगन्निवास।**
**तेथें कळलें कीं भेटाया आलासे निज-दास॥१॥**
**झडकरि उठला दयालु बांधव वस्त्रादिक नावरितां।**
**धावत आला पुढें रमेला सोडुनि दासाकरितां॥२॥**
**'ये ये बंधो' ऐसें सद्गद बोलत धांवत आला।**
**कडकडुनी भुज-युग्में स्व-सखा हृदयीं धरिता झाला॥** (मोरो०)

**टीप**—काव्यगुण किंवा रसोत्पत्ति यांविरहित काव्य एकप्रकारें बेचव म्हणजे नीरस असतें; म्हणून प्रसाद, माधुर्य व ओज ह्या तीन काव्यगुणांसंबंधानें व नव-रसांसंबंधानें येथें किंचित् दिग्दर्शन केलें आहे.

## भाषेचे अलंकार

कविप्रतिभानिर्मित, मनोल्हादक, चमत्कृतियुक्त अशी जी शब्दरचना तिला "**अलंकार**" असें म्हणतात.

'ओठ लाल आहेत' असें म्हणण्यापेक्षां 'ओठ **बिंबफलाप्रमाणें** आहेत' ह्या म्हणण्यांत प्रतिभा म्हणजे कविकल्पना, मनोल्हादकत्व आणि कांहीं अंशीं चमत्कृति आहे; म्हणून हें म्हणणें अलंकारयुक्त आहे. त्याचप्रमाणें 'सीतेचें **मुखकमल** रामाला पाहून प्रफुल्ल झालें,' 'तो **नर–शार्दूल** रामचंद्र धनुष्य भंगील असें सर्वांस वाटलें,' ह्या उदाहरणांत सीतेचें मुख हें खरोखर कांहीं सर्वस्वीं कमलाप्रमाणें नाहीं, तसेंच रामचंद्र हा कांहीं खरोखर शार्दूल नाहीं, परंतु कवीनें फक्त कमलाचा नाजूकपणा व वाघाचा पराक्रम एवढ्या गुणांपुरती आपली कल्पना त्या दोघांवर लादल्यामुळें साध्या अर्थाच्या वाक्यांपेक्षां त्यांत चमत्कृति उत्पन्न झाली व त्यामुळें त्यास मनोहरत्वही आलें; म्हणून हीं वाक्येंही अलंकारयुक्त आहेत. परंतु "हिंदुस्थानचा आकार त्रिकोणाप्रमाणें आहे" या वाक्यांत फक्त वस्तुस्थिति आहे, कल्पना व चमत्कृति ह्या गोष्टी नाहींत व तज्जन्य मनोहरत्वही नाहीं, म्हणून हें वाक्य अलंकारयुक्त नाहीं. असेल त्यापेक्षां निराळ्या रीतीनें कल्पना लढवून, अतिशयोक्ति करून, किंवा चमत्कार वाटेल अशी योजना करून बोलण्याची मनुष्याची बलवत्तर प्रवृत्ति असल्यानें भाषेंत अलंकार-निर्मिति होते.

भाषेला केव्हां शब्द-चमत्कृतींनीं व केव्हां अर्थ-चमत्कृतींनीं शोभा येते; ह्यामुळें अलंकारांत **शब्दालंकार** व **अर्थालंकार** असे दोन भाग पडतात.

### शब्दालंकार

**यमक**, **अनुप्रास**, **श्लेष** व **चित्र** असे शब्दालंकारांचे मुख्यतः चार प्रकार आहेत.

**१. यमक**—पद्याच्या एका चरणांत एकदां ज्या क्रमानें अक्षरें आलीं, त्याच क्रमानें परंतु भिन्न अर्थानें दुसऱ्या चरणांत अक्षरें आल्यास हा अलंकार होतो. उदा०—

**घोडे कधीं न खळती रविच्या रथाचे।**
**उल्लंघितो पवन भाग सदा नभाचे।**
**भूभार शेष धरि संतत मस्तकांहीं।**
**राजास विश्रम तसा क्षणमात्र नाहीं।**

सुंदरें मंदिरें दिव्य दामोदरें ।
वास तेथें किजे नित्यदामोद रे॥
लोक संपन्न ते पुत्र-दारा-धनें
दास सायुज्यता श्रीपदाराधनें ॥

सेवुनि संतत पाला, संत तपाला यदर्थ करितात ।
तो प्रिय या स्तवना कीं, यास्तव नाकींहि तेंचि वरितात ॥

२. **अनुप्रास**—वर्णांच्या पुनरावृत्तीमुळें हा अलंकार होतो. उदा०—

मल्लवेश रचिला अभिराम श्रीधर प्रभुसवें बळराम ॥
मोरपत्र मुकुटीं तरु-पत्रें । नेत्र सुंदर जशीं शत-पत्रें ॥

यांत 'र' या वर्णाची अनेक वेळां पुनरावृत्ति झालेली आहे.

हळु हळू घन गर्जतसे नभीं । मुरलिहूनि चढेल म्हणोन भी ॥
श्रवण-भक्ति अतिक्रम वर्जतो । करित कीर्तनहीं घन गर्जतो ॥

यांत अनेक वर्णांची पुनरावृत्ति आहे, हें सहज कळून येईल.

३. **श्लेष**—एकाच वाक्यांतील शब्दांच्या द्व्यर्थी योजनेनें हा अलंकार होतो.

ती शीतलोपचारीं, जागी झाली हळूच मग बोले ।
'औषध नलगे मजला,' परिसुनि माता 'बरें' म्हणुनि डोले ।

४. **चित्र**—जेथें पद्म, खड्ग, चक्र, इ० आकृतींमध्यें रचना करून वैचित्र्य आणिलेलें असतें, तेथें हा अलंकार होतो. याचें नमुन्यापुरतें एकच उदाहरण देतों.

खालील पद्मबंधांत चरणांच्या शेवटचीं व आरंभींचीं तीन–तीन अक्षरें कमलाकृतींत बसाविलेलीं आहेत.



**हाय कामचि हा गेला। लागे हाता न गेय हा॥**
**हाय गे न जहाला कां। कालाऽहारार्थ काय हा?॥**

**अर्थ**—एक वृद्ध स्त्री म्हणते, ' अरेरे! हें शरीर विगलित झालें. तें पुनः तरुण होऊं शकत नाहीं. हें आतां काळानें हरण करण्यायोग्य झालें काय?'

## अर्थालंकार

अर्थालंकारांचें निरीक्षण केल्यास असें दिसून येईल कीं, बऱ्याचशा अलंकारांच्या मुळाशीं साम्य किंवा विरोध ह्यापैकीं एक गोष्ट आहे. 'मुख चंद्रासारखें आहे' असें म्हटल्यानें उपमा हा अलंकार होतो. पण एवढेंच म्हटल्यानें मनाचें समाधान होत नाहीं; तेव्हां 'मुख जणुं काय चंद्रच आहे' असें आपण म्हणतों. म्हणजे उपमेची उत्प्रेक्षा झाली. तेवढ्यानें समाधान न झालें तर 'तो मुख-चंद्र पहा' असें आपण म्हणतों. येथें दोहोंचा अभेद दर्शविला; म्हणजे रूपक झालें. मुख व चंद्र हीं नुसतीं एकच आहेत असें दर्शविण्यापेक्षां दोहोंमध्यें घोटाळा होण्याइतकें साम्य दर्शविल्यानें अधिक चमत्कृति उत्पन्न होते. 'हें मुख कीं चंद्र?' येथें 'संदेह' उत्पन्न झाला. ह्याच्याही पुढें जाऊन 'अहो, ह्या मुखाला मी चंद्रच समजलों कीं!' या वाक्यानें अधिक परिणाम होतो. येथें 'भ्रांति' उत्पन्न झाली. 'हें मुख नव्हे, चंद्र आहे' अशी वस्तुस्थिति लपवून आपण तीवर दुसराच आरोप लादतों, तेव्हां अपन्हुति होते. ह्याप्रमाणें वाढवीत गेल्यास एकांतून दुसऱ्या अलंकारांची उत्पत्ति होते, असें दिसून येईल. म्हणूनच कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं उपमेसंबंधानें म्हटलें आहे कीं, "उपमा हीच कोणी नटी निरनिराळीं सोंगें घेऊन आपल्या पुढें येते; व आपण त्या त्या प्रसंगीं त्या त्या रचनेला अलंकाराचें भिन्न नांव देतों.

### १. उपमा

यांत दोन वस्तूंचें आल्हादजनक रीतीनें **साम्य** वर्णिलें असतें.

[या अलंकारांत उपमेय, उपमान, साधारण धर्म व साम्यसूचक शब्द ह्या गोष्टी हव्यात. क्वचित् यांपैकीं एकादीचा लोपही आढळतो.]

(१) **गजा तृणाच्छादित कूप जैसा।**
**नृपा असत्य-प्रिय चार तैसा॥**
**नाशास हो कारण जो तयांस।**
**ये ना मुळींही चुकवावयास॥**

(२) तो शर गर-वर-धर-सा,
पवि-सा रवि-सा स्मरारिसायक-सा ॥
पार्थ-भुजांतरिं शिरला,
वल्मीकामाजि नाग-नायक-सा ॥ ( मोरो० )

## २. उत्प्रेक्षा

उपमेय हें जणुं कांहीं उपमानच आहे असें जेथें वर्णन असतें, तेथें हा अलंकार होतो.

(१) ही आम्र-पंक्ति पवनें बहु डोलताहे ।
शाखाग्र-पल्लव-करें कुसुमांस वाहे ॥
जाणो स्व-पोषक वसंत गृहास आला ।
तत्पूजनार्थ बहु हर्षचि हीस झाला ॥

(२) समरीं मत्त मतंगज, कीं दीर्घ व्याघ्र, कीं मृगाधिपती, ।
कीं वृष, कीं घन, कीं ग्रह, कीं नग, कीं अंधक स्मरारातो ॥

[ येथें इंद्रजित व लक्ष्मण जणुं कांहीं वरीलप्रमाणें भासत होते, असें वर्णन असल्यामुळें **उत्प्रेक्षा** हा अलंकार झाला आहे. ]

## ३. रूपक

उपमेय व उपमान यांचा अभेद वर्णिला असतो, तेथें हा अलंकार होतो.

(१) मद्दुःख-सागराचा अगस्त्य तूं, काय बा तुझें नांव ?
चिंता-नदींत बुडतां, दैवें कोठोनि धाडिली नाव ? ॥

(२) गुरु कर्णधार त्याची सुदृढा तत्त्वोपदेशवाक् सु-तरी ।
धरुनि भवांबुधि तरले, बहु बुध तत्कीर्तिही जना उतरी ॥

## ४. अतिशयोक्ति

वस्तुस्थिति असेल त्यापेक्षां फारच फुगवून सांगितलेली असते, तेव्हां हा अलंकार होतो.

१) जो अंबरीं उफळतां खुर लागलाहे ।
तो चंद्रमा निज-तनूवरि डाग लाहे ॥
जो या यशास्तव कसें धवलत्व नेघे ।
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ ( र० पं० )

## ५. अपह्नुति

जेथें एकादी वस्तु आहे हें माहीत असून, ती ती नाहींच, असा निषेध करून ती दुसरीच वस्तु आहे असें प्रतिपादन असतें, तेथें हा अलंकार होतो.

(१) न हें नभोमंडल, वारि-राशी।
न तारका, फेसचि हा तयाशीं॥
न चंद्र हा, नावचि चालताहे।
न अंक तो, तीवर शीड आहे॥

द्यर्थी शब्दांची योजना करून, त्या दोन अर्थांपैकीं एकाचा निषेध व लगेच दुसऱ्याचा आरोप ज्यांत केलेला असतो, तिला '**छेकापह्नुति**' असें म्हणतात. तिचें **रामजोशी** यांचें उत्कृष्ट उदा०—

(२) राधा-सखि-संवादें छेकापन्हुति ही आयका,
रसिक हो किती चतुर बायका॥ ध्रु०॥
अंबरगत परि पयोधरातें रगडुनि पळतो दुरी—
काय हा धीट म्हणावा तरी?॥
तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हय्या हरी—
नव्हे गे मारुत मेघोदरीं॥ १॥

## ६. व्याज-स्तुति

बाह्यतः स्तुति व खरोखर निंदा किंवा बाह्यतः निंदा पण खरोखर स्तुति, असें जेथें वर्णन असतें, तेथें हा अलंकार होतो.

पितामह वदे तदा प्रबळ तूं पृथानंदना।
रमेश रथि सारथी चतुर वागवी स्यंदना॥
स्वयें गत-वयस्क मी, सरस वीर तूं रे नवा।
भिडें; रणधुरंधरा, जय घडो सुखें वा न वा॥
(वामन)

## ७. अन्योक्ति

प्रस्तुत वस्तूविषयीं बोलावयाचें असतां अप्रस्तुत वस्तूविषयीं बोलून प्रस्तुत वस्तूची कल्पना आणून दिली असते, तेव्हां **अन्योक्ति** किंवा '**अप्रस्तुत-प्रशंसा**' हा अलंकार होतो.

**सांबाच्या पिंडीतें बससि अधिष्ठून वृश्चिका, आज ॥**
**परि तो आश्रय सुटतां खेटर उतरील रे तुझा माज ॥** (वि० भिडे)

[ येथें विंचवाला पुढें करून, मोठ्याच्या आश्रयाला राहून माजलेल्या क्षुद्र मनुष्याबद्दल अप्रत्यक्षतः विधान केलेलें आहे. ]

## ८. अर्थान्तरन्यास

जेथें सामान्य विधानाच्या समर्थनार्थ विशेष गोष्टीचें उदाहरण दिलें जातें, किंवा विशेष गोष्टीवरून सामान्य सिद्धान्त प्रतिपादिलेला असतो, तेथें हा अलंकार होतो. उदा०—

(१) **"आली जरी कष्ट-दशा अपार ।**
**न टाकिती धैर्य तथापि थोर" ॥**
**केला जरी पोत बळेंचि खालें ।**
**ज्वाला तरी ते वरतीं उफाळे ॥** (वामन)

(२) **तदितर खग भेणें वेगळाले पळाले ।**
**उपवन-जल-केली जे कराया मिळाले ॥**
**स्व-जन गवसला जो त्याजपाशीं नसे तो ।**
**"कठिण समय येतां कोण कामास येतो ?" ॥** (र० पं० )

## ९. दृष्टान्त

उदाहरण देऊन जेव्हां एकादी गोष्ट अधिक स्पष्ट केली असते, तेव्हां हा अलंकार होतो.

(१) **न कळतां पद अग्निवरी पडे ॥**
**न करि दाह असें न कधीं घडे ॥**
**अजित-नाम वदो भलत्या मिषें ।**
**सकल पातक भस्म करीतसे ॥**

(२) **विद्यासमन्वितहि दुष्ट परी त्यजावा ।**
**त्याशीं बुधें न सहवास कधीं करावा ॥**
**ज्याच्या असे विमलही मणि उत्तमांगीं ।**
**तो सर्प काय न डसे खल अंतरंगीं ? ॥** (वामन)

## १०. विरोधाभास

वास्तविक विरोध नसूनही जेथें विरोध आहे असें वर्णन असतें, तेथें हा अलंकार होतो.

**( १ ) मारी यांत बुडी जो तो तरे, यास सकर्दमा।**
**मानवाधमही पावे पाहतां गति उत्तमा॥** ( मुजुमदार )

[ येथें बुडी मारील तो वस्तुतः बुडावयास हवा; परंतु 'तरेल' असें म्हटल्यानें बुडणें व तरणें ह्या दोन विरोधदर्शक गोष्टी एकत्र आल्या आहेत. ]

**( २ ) वज्रापेक्षांहि कठिणें, पुष्पाहूनि मृदु अशीं।**
**लोकोत्तरांचीं हृदयें कोणा जाणवतील तीं॥** ( प० गोड० )

[ येथें लोकोत्तर पुरुषांचीं मनें अति कठीण व मृदुही असतात, असा विरोध दाखविला आहे; परंतु तो प्रासंगिक असल्यामुळें वस्तुतः विरोध नाहीं. म्हणून हा **विरोधाभास** अलंकार होय. ]

## ११. यथासंख्य

पाहिल्यानें ज्या क्रमानें शब्द आले असतील त्याच क्रमानें त्यांचा दुसऱ्या शब्दांशीं संबंध जुळविलेला असतो, तेथें हा अलंकार होतो.

( १ ) **तृणें मृगाला सलिलें झषाला।**
**संतोष हे वृत्ति महा-जनांला॥**
**तयांस निष्कारण तीन वैरी।**
**किरात, कैवर्तक, दुष्ट, भारी॥** ( वामन )

( २ ) **सुविद्यता, शौर्य, विनीतता, खरी।**
**कुमारकांची अवलोकिल्यावरी॥**
**कृतार्थता, भीति, मुदा, हृदन्तरीं।**
**गुरूंस, शत्रूंस, पित्यास, वाटली॥** ( वामन )

## १२. स्वभावोक्ति

एकाद्या गोष्टीचें हुबेहूब वर्णन असलें म्हणजे हा अलंकार होतो.

( १ ) **अंग वक्र अधरीं धरि पावा।**
**गोप-वेष हरि तोचि जपावा।**
**वाम-बाहुवरि गालहि डावा।**
**तो ठसा स्व-हृदयांत पडावा॥** ( वामन )

(२) चिमकुली पगडी झळके शिरीं।
चिमकुली तरवार करीं धरी॥
चिमकुला बहु शोभत चोळणा।
चिमकुला सरदार निघे रणा॥ (कुंटे)

[ येथें पहिल्या पद्यांत कृष्णाचें व दुसऱ्यांत बाल-संभाजीचें यथातथ्य वर्णन केलेलें आहे. ]

## १३. पर्यायोक्ति

एकादी गोष्ट स्पष्टपणानें न सांगतां आडवळणांनीं सूचित करणें, ह्या योगानें हा अलंकार होतो.

केलेंचि धन्य दर्शन-दानें, येऊनि कानना मातें।
अजि देवेश! निवावे, बहु हे सेवूनि कान नामातें॥ (मोरो०)

[ येथें सावित्रीनें यमाला एकदम " तुमचें नांव काय? " असें न विचारितां ' आपण आम्हांला दर्शन देऊन धन्य केलें, त्याअर्थी आपलें नांव ऐकून कानही संतुष्ट व्हावेत, ' असें मार्दवानें पण पर्यायानें सुचविलें आहे. ]

## १४. सार

एकापेक्षां दुसऱ्याचे गुण अधिक, त्यापेक्षां तिसऱ्याचे अधिक, ह्याप्रमाणें जेथें गुणांचें उत्तरोत्तर आधिक्य वर्णिलें असतें, तेथें हा अलंकार होतो.

(१) आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला।
झाला तशांत जरि वृश्चिक-दंश त्याला॥
झाली तयास तदनंतर भूत-बाधा।
चेष्टा वदूं मग किती कपिच्या अगाधा! (वामन)

(२) वाहे महीतें स्वशिरीं फणींद्र तो।
पाठीवरी कूर्म तयास वाहतो॥
त्यालाहि घे सागर मांडियेवरी।
थोरांचिये थोरिव जाण यापरी॥ (वामन)

## १५. प्रश्न

वाक्यांत प्रश्न केलेला असतो, परंतु त्यांतच त्याचें निश्चित उत्तरही असतें; त्यावेळीं हा अलंकार होतो.

**(१) अपराध काय घडला? रुसवा केला दयानिधे कां? जी!**
**अमृत प्राशन करवुनि, पाजावी काय शेवटीं कांजी? ॥**
**(२) व्रणार्त पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे।**
**स्मरादि रिपु मन्मनीं, अहि न काळ भेका कसे?॥** (मोरो०)

[ यांतील दुसऱ्या अर्धातील प्रश्नांचीं उत्तरें त्यांतच स्पष्ट सांगितलेलीं आहेत. ]

## १६. श्लेष

जेव्हां केवळ एकाद्या शब्दामुळेंच दोन अर्थ उत्पन्न होत नसून, सबंध वाक्याचेच दोन अर्थ उत्पन्न होतात, तेव्हां हा अलंकार होतो.

[ शब्द–श्लेषामध्यें एका शब्दाबद्दल दुसरा पर्याय-शब्द घालून चालत नाहीं; अर्थ–श्लेषांत तें चालूं शकतें; हा या दोहोंत मुख्य फरक. ]

**(१) तूं मलिन, कुटिल, नीरस, जडहि, पुनर्भवपणेंहि कच साच।**
**धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि; नाम कच साच॥**

[ येथें सर्व पद्याचा अर्थ केश व कच या दोहोंकडेही लागत आहे. ]

## १७. चेतन–गुणोक्ति

अचेतन वस्तूंमध्यें चेतन वस्तूंचे गुण जेथें वर्णिलेले असतात, तेथें हा अलंकार होतो.

**(१) दावी रडोनि झाले, जे गंध उगाळितां स्व-हात किणी।**
**भीम म्हणे, 'विधि-लेखनि, लेखनि नच वचकलीस घातकिणी!'**
**(२) वृक्षा, त्वज्जन्म–साफल्य, साधूचें व्रत पाळिशी।**
**स्वतां सोसूनियां ताप, छाया पांथांस वोपिशी॥**

[ येथें लेखणी व वृक्ष यांवर चेतन-गुणांचा आरोप केला आहे. ]

## १८. लोकोक्ति

प्रचारांत असलेल्या म्हणींचा जेथें काव्यांत उपयोग केलेला असतो, तेथें हा अलंकार होतो.

**(१) हरिच्या पुनःपुन्हां कां 'काड्या नाकांत घालिशी?' मशका,**
**यश काय पक्षि-पतिचें, येइल हें चार करुनि तुज मशका? ॥**

(२) जो किंकर पायांला, स्व-शिर करुनि पाद-पीठ आतळतो।
धिक्कारुनि न करावा, प्रभुंनीं 'पाण्यापरीस पातळ' तो ॥

याप्रमाणें येथें विद्यार्थ्यांस आवश्यक तेवढे प्रमुख अलंकार दिले आहेत; मत-भेदात्मक व शास्त्रीय भानगडींत पडण्याचा येथें प्रयत्न केला नाहीं.

---

# भाषा-कला-विलास

काव्यगुण व काव्याला शोभा देणारे अलंकार यांचा येथवर विचार झाला. यांशिवाय भाषेचा **कलाविलास** दर्शविणाऱ्या आणखीही कांहीं गोष्टी असतात; त्यांची ढोबळ कल्पना येथें देतों.

## सुभाषित

१. स्वाभाविक अर्थमनोहरत्वामुळें केव्हा केव्हां भाषा सुन्दर वाटते, तिच्यांत अलंकारांप्रमाणें मुद्दाम सौन्दर्य आणावें लागत नाहीं, अशा रचनेला "**सुभाषित**" असें म्हणतात. सुभाषित ह्या शब्दाचा "चांगलें भाषण" किंवा "चांगलें वाक्य" एवढाच अर्थ आहे; मात्र तें मनोहर, स्वयंपूर्ण व कोणत्याही कालीं त्या त्या प्रसंगाला लागू पडणारें असलें पाहिजे.

(१) **गुळ-खोबरें विलोकुनि, भलत्याहि जनास बालक वळावा।**
**सत्य प्रेमचि दावुनि, सुज्ञें तो विश्वपाळ कवळावा!** (मोरो०)

(२) **बह्वर्थ, जन-मनोहर, स्वल्पाक्षर, मधुर, सत्य, बोलावें।**
**ज्या सद्वाक्य-श्रवणें, श्रोत्यांचें चित्त, शिरहि डोलावें!॥**

हीं मराठींतील **सुभाषितें** आहेत.

## कोटि

२. जेव्हां एकाद्या श्लेषात्मक शब्दाच्या योगानें आगाऊ ध्यानीं-मनीं नसतां एकदम व्यंग्यार्थ उत्पन्न होऊन आपणांस आश्चर्य वाटतें व हंसूं येतें, तेव्हां तेथें "**कोटि**" झाली असें म्हणतात.

(१) "आमच्या तिंबूनानांच्या ठकीकडे बघितल्यास **सहस्रदेवींचें** दर्शन होतें!"

[ येथें ठकीच्या तोंडावर देवींचे हजारों वण आहेत, इतकी ती कुरूप आहे, हा व्यंग्यार्थ एकदम ध्यानांत येऊन, एक प्रकारें त्या रचनेची मौज वाटते व हास्या-

कडे कल झुकतो; म्हणून 'सहस्र-देवि' ह्या शब्दावर येथें गडकऱ्यांनीं **कोटि** केली आहे, असें म्हणतां येईल. ]

(२) "त्याला **डोकें** आहे" असें कोणीं म्हटल्यास, एकदम तो नुसतेंच 'डोकें' असलेला बुद्धिहीन प्राणी आहे, असा व्यंग्यार्थ उत्पन्न झाल्यास, तेथें डोकें या शब्दावर **कोटि** झाली असें म्हणतां येईल.

## विनोद

**३.** जेव्हां विचारांस असंबद्ध, विकृत किंवा अद्भुत स्वरूप प्राप्त होऊन एकंदर परिणाम मात्र हास्योत्पादनपर होतो, तेव्हां त्या वाक्यरचनेस "**विनोद**" किंवा "**विनोदवचन**" असें म्हणतात (न० चिं० केळकर).

"म्हातारपणामुळें नीतीवर जो संस्कार होतो तो लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. म्हाताऱ्याच्या अंगीं ताठा असल्याचें किंवा त्यानें काठीचा उपयोग मारण्याचे कामीं केल्याचें अजून माझ्या ऐकिवांत नाहीं. तसेंच त्याला आपल्या सौंदर्याचा किंवा सामर्थ्याचा अभिमान झालेला क्वचितच पाहण्यांत येतो" इ०. (श्री० कृ० कोल्हटकर). [ म्हाताऱ्याचें हें विकृत वर्णन केलेलें वाचून, थोडेंसें हंसूं आल्यावांचून राहत नाहीं; म्हणून हें **विनोद-वाक्य** किंवा **विनोद-वचन** होय. ]

केव्हां केव्हां विनोदामध्यें परानुकरण व त्याबरोबरच परकृतीचा किंचित् उपहास, या गोष्टी असतात; तेव्हां त्याला "**विडंबन**" असें म्हणतात. उदा०—(१) "पांखरा, येशिल का परतून?" या कृतीचें "पारिटा, येशिल का परतून" हें विडंबन आहे. (२) "आम्ही कोण म्हणून काय पुसतां दांताड वेंगाडुनी?" हें केशवसुतांच्या "आम्ही कोण?" ह्या कवितेचें विडंबन आहे. हीं दोन्ही विडंबन-पद्यें 'केशव-कुमारांचीं' आहेत.

## वाक्प्रचार

**४.** भाषेंत विशिष्ट शब्द ठराविक शब्दांच्याच साहचर्यानें ठराविक रूपांत व ठराविकच क्रमानें आले पाहिजेत; अशी रूढि किंवा प्रचार आढळतो; त्याला "**वाक्प्रचार**" असें म्हणतात. भाषागौरवार्थ त्यांचीही जरूरी असते; त्यांविरुद्ध भाषण किंवा लेखन झाल्यास, तें शिष्टमान्य समजत नाहींत. उदा०-(१) घबाड म्हणजे मोठें; यावरून घबाड मुहूर्त, घबाड वशिला, हे शब्दप्रयोग चालतात; पण घबाड शरीर, घबाड अंमलदार, असले शब्दप्रयोग चालत नाहींत. (२) "चोराच्या उलट्या बोंबा" याऐवजीं "उलट्या चोराच्या बोंबा" हा शब्दप्रयोग ग्राह्य मानीत नाहींत. तसेंच (३) 'पायांत जोडा घालणें' व (४) 'डोक्यांत

पागोटें घालणें' हे शब्द-प्रयोग वस्तुस्थितीच्या अगदीं विरुद्ध असूनही, ते आपण खुशाल ग्राह्य समजतों. हे **वाक्प्रचार** होत.

### म्हण

५. वारंवार म्हटली गेलेली जी शब्द-संहति ती " **म्हण** " होय. **म्हण** हीही एक प्रकारें वाक्प्रचारच होय; म्हणींत पुष्कळ दिवसांचा एकादा अनुभव किंवा ज्ञान साठविलेलें असतें आणि बरेच वेळां यमक-बद्धतेमुळें तिला चटकदारपणा आलेला असतो. उदा०—(१) कर नाहीं, त्याला डर नाहीं (२) करावें तसें भरावें (३) असतील शितें, तर मिळतील भुतें (४) कधीं तुपाशीं, कधीं उपाशीं (५) आपला हात जगन्नाथ (६) अपापाचा माल गपापा (७) भीड भिकेची बहीण (८) पुराणांतलीं वांगीं पुराणांत, इ०.

---

## कांहीं काव्यदोष

काव्याचे गुण कळल्यानंतर प्रौढ अभ्यासकांस त्यांतील ढोबळ दोषही कळणें अवश्य आहे. **व्याकरण-दोष, शब्द-दोष** व **छन्दोदोष** असे तीन प्रकारचे दोष केव्हां केव्हां आढळून येतात. व्याकरण-दोषालाच **'च्युत-संस्कृति'** असें म्हणतात.

### (१) च्युत-संस्कृति

**क**

| | |
|---|---|
| १. **श्रिकृष्ण** वेणु वाजवी । विधी **भुगोळ** गाजवी<br>२. रामाची बहु **अप्रिती** मजवरी होईल गे सर्वथा<br>३. हलवील **विराची** काया. | येथें अप्रयुक्त ऱ्हस्व-दीर्घत्व हा दोष आहे |

**ख.**

| | |
|---|---|
| १. दिलें बापें **भावें** त्यजुनि वरवे ते क्षितिपती | भाऊ याची अप्रयुक्त तृ० |
| १. **कोशागारमधूनि** फार कनका सांगोनियां काढवी | सामान्यरूपाचा अभाव. |
| १. नगां त्यागुनि वैराग्य तुवां **घेलें** ( घेतलें ) | अप्रयुक्त क्रियापदरूप |
| १. **त्वां प्रल्हाद-ध्रुवादि** स्वहित कथुनियां नारदा, धन्य **केला** ( लें ) | प्रयोग-शैथिल्य |

| | |
|---|---|
| १. धूलिनें धुंद **दिक् चारी** (दिक् एकवचन, चारी अने० व०) | वचन—दोष |

| | |
|---|---|
| १. हे वारितां **ध्वनि** उठे **कर-कंकणाची**<br>२. सख्या रे **जीवघेणी** हा सरायाचा कधीं **खेळ** ? | लिंग—दोष |

**ग.**

| | |
|---|---|
| १. जया कंदनीं **तोषलाऽनंग-दाहो** (तोषला + अनंग)<br>२. **मगैश्वर्या** हानी सहजचि घडे भानुसदनीं ( मग+ऐश्वर्या )<br>३. सौदागरांनीं **धरिलाऽधमासी** ( धरिला+अधमासी ) | अपसंधि |

| | |
|---|---|
| १. कवळित **पयधारा** अंजुळीनें वरोनी ( पयोधारा हवें )<br>२. अर्पूनि चित्तें **जग-जीवनांत** ( जगज्जीवन हवें )<br>३. शक्तिरूपें जगन्माता वर्तते **जगदांतरीं** ( जगदंतरीं हवें )<br>४. पतीत-पावन **जगदोद्धारक** नाम तुझें राया (जगदुद्धारक) | नियमाविरुद्ध संधि |

| | |
|---|---|
| १. ध्याती **रमा-अब्जभवादि** ज्यातें<br>२. **स्व-अनुरूप** परस्पर दंपती<br>३. **लोचन-आनन-अंबुज-कानन-अंबु-रुहें** सकळें विमळें<br>४. वदे ऐसें ठेवी हरि **जननि-अंकीं** अणि निघे | विसंधि |

**घ.**

| | |
|---|---|
| १. नको रे मना या जिवा **कर्म-बेडी** ( सं० व य० )<br>२. नसे साधिला युक्तिचा **यत्न-किल्ला** ( सं० व य० )<br>३. वनातेंही केलें श्रम न गणुनी **स्वात्म-घरसें** (सं० व म०)<br>४. व्योमासि चुंबित असे **द्विज-होम-धूर** ( सं० व म० ) | अप्रयुक्त समास |

## (२) शब्द-दोष

**च.**

| | |
|---|---|
| १. वीर **गच्छले** सैन्य घेउनी ( सं० शब्दाला म० प्रत्यय )<br>२. म्हणे पार्थ आतां करूं **फैसला** हो (मध्येंच अरबी शब्द)<br>३. हळुच मग दटावी ते **दरोगीण** त्यासी ( ” )<br>४. प्रभुसम पूज्य मला तो म्हणतां ‘ तुभ्यं नमो रमाजाने ’ ।<br>५. न केला मुळीं **संग्रहो** सद्गुणांचा ।<br>अतां भोगितों मी **विपाकू** तयाचा ( त्रि० कों० ओक० ) | भलत्याच ठिकाणीं अप्रयुक्त यवनी, संस्कृत व मराठी शब्दयोजना |

छ.

| | |
|---|---|
| १. जरठसा शिशिर तो ध्रुव-पदीं **वि**-रतला<br>२. सख्या वाचका, गीत कवींचें ऐकुनियां **निज**-कानीं<br>३. नव-शिशूवरिल या जननिची **सु**-ममता<br>४. बस तुं **मौनपणें** अथवा **उगा** (वामन) | निष्कारण अधिक शब्द |

ज.

| | |
|---|---|
| १. तत्रापि जे प्रिय बहू स्व-वधूं**चि** माजी<br>ते स्थापणें तरु तिच्या सदना**चि**माजी (वामन)<br>२. हें न म्हणे कृपाळू प्राण **पै** गा (ज्ञाने०) | निरर्थक पाद-पूरणार्थक शब्द |

झ.

| | |
|---|---|
| १. कटकीं होते वाजी, वारण जे काय बहु मदें उतले।<br>ते त्यापुढें न तगले, **हगले** तात्काळ गर्जतां **मुतले** ॥<br>२. बोल बोलतां सोपें वाटे। करणी करितां **टीर** फाटे (तुका०) | अश्लील शब्द-योजना |

ञ.

| | |
|---|---|
| 'त'-वर्गान्त्योपान्त्यां करुनि उलटे लाहिभर दे<br>[न व ध यांच्या उलट म्हणजे 'धन' दे हा अर्थ] | क्लिष्टत्व |

ट.

| | |
|---|---|
| १. म्हणे हंस क्षोणी-पतिस **तुज** कोणी **सम** नसे (दूरान्वय)<br>२. असे हे गोसावी **रहित** समजा **राम-भजना**<br>३. लंगोटी **भर वीत** रुंद मळक्या चिंध्या शिरीं बांधुनी<br>४. **मुळें या**, अखिल जीवांना, नवीशी चेतना येई<br>५. जादूनेंच तुझ्या बा रे। **वन नंदन** बनलें सारें | शब्दानुक्रम उलट |

ठ.

| | |
|---|---|
| १. **गाढव** श्रृंगारिलें कोडें। कांहीं केल्या नव्हे घोडें<br>त्याचें **भुंकणें** न राहे। स्वभावासी करिल काये? ॥<br>२. घंटा जड घण घेणं। वाजताती मण मण।<br>**मक्षिकांचा खण खण**। मध्यें जेव्हां धांवला। | अयोग्य वाक्प्रचार |

ड.

| | |
|---|---|
| १. **भयाण** अन् **भेसूर** श्वापदें क्रूर तियेच्या उरीं<br>२. **मुकुल-कलिके**परि गाल ते फुगीर | पुनरुक्ति |

## ( ३ ) छन्दो-दोष

**अ.**

१. तळ्तें **रक्त-प्रवाह** वाहवुनियां भूमीवरी स्थापिलीं
२. **निराश-प्रद** निष्फला तुज कशास आशा जरी ?
३. बळकट **पिंजराही** तूज नाहीं बसाया
४. होती तामस जी वदे '**गुंफुनि** मी, घालीन वेणी शिरीं' ।

} लघु-गुरु याकडे दुर्लक्ष

**आ.**

१. उत्कर्षें स्वामि-निष्ठा होती **सा**,चार ती
२. ठेविलें **दा**,रीं न जों **पा**,ऊल तूझ्या मंजुळे
३. प्रभूनें म्हणे हे पहा आंग; **लीला**—
**वती** मीं वरावें मला चांगलीला ॥

} यति-भंग

**इ.**

१. नाम-प्रतापहि यथा-मति याच **रीती** ।
सीमा न पावति तथापि मुनींद्र **गाती** ॥
२. स्वप्नमय **चित्रा** । अर्पीन मनोहर **कविता** ॥
३. नमस्कार तुज **पूर्णत्वा** । हात जोडितें तुला **अतां**

} यमक-दोष

४. पद्में प्रफुल्ल करितो सविता स्वयें **हा** ।
रात्रीं विकास कुमुदांप्रति फार दे **हा** ॥
५. शुक भवानिधि तरले, परि योगालाबू **धरूनियां पोटीं** ।
एकोबाही तरले, भव-प्रस्तर दृढ **धरूनियां पोटीं** ॥

} एकार्थकच शब्दांमुळें यमक-दोष

**ई.**

**त्याचा हेतु पुरे अशीस अपुरें आयुष्य जेणें घडे ।**
**दोघां एक जडे कळा न विघडे ऐसें करूं रोकडें ॥**
**पाहूं गंधर्व आतां जगविति वनिता दाउनी विक्रमाशी ।**
**केवीं आम्हांपुढें ते सकळहि निरखूं आजि शौर्य-क्रमासी ॥**

[ येथें पहिले दोन चरण शार्दूल-विक्रीडित वृत्तांत व पुढील दोन चरण स्रग्धरा वृत्तांत आहेत. यास **वृत्त-दोष** म्हणतां येईल; हा श्लोक वामनाचा आहे. ]

———

# छन्दःशास्त्र

## प्रास्ताविक

(१) मनोरंजक व कल्पनारम्य अशा प्रकारची जी वाक्यरचना असते, तिला **काव्य** असें म्हणतात, हें मागील प्रकरणांत आलेंच आहे. गद्यांतही अशा प्रकारची रचना असूं शकते व पद्यांतही असूं शकते. पद्यांतील रचनेंत पाद म्हणजे चरण असतात, गद्यांत ते नसतात, एवढाच फरक. पद्याची रचना ज्या ठरांविक नियमांनीं होते, त्यांसंबंधानें आतां येथें विचार करावयाचा आहे.

(२) कोणत्या पद्यामध्यें कोणत्या प्रकारचें नियमन आहे, हें समजण्यासाठीं ऱ्हस्व-दीर्घादिकांची नीट समजूत पाहिजे. **परशुरामतात्या गोडबोले** यांचें वृत्तदर्पणांतलि लघु-गुरु-संबंधाचें खालील पद्य प्रसिद्धच आहे.

**ऱ्हस्व स्वरातें लघु बोलताती। दीर्घ स्वरातें गुरु नाम देती॥**
**पुढें अनुस्वार विसर्ग येतो। संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतो॥**

वदन, नमन, यांतील सर्व अक्षरें **लघु** आहेत; काका, मामा, यांतील **गुरु** आहेत; सुंदर, चिंता, घंटा, धंदा, अंगण, उंट, उंबर, इंदिरा, यांतील अनुस्वारा-पूर्वीचीं अक्षरें ऱ्हस्व असलीं तरी **गुरु** आहेत; विद्या, बुद्धि, गर्व, शिक्षा, सत्य, यांतील जोडाक्षरापूर्वींचीं अक्षरें **गुरु** आहेत; तसेंच दुःख, निःसंदेह, निःपात, प्रातःस्नान, यांतील विसर्गापूर्वींचीं अक्षरें ऱ्हस्व असलीं तरी **गुरु** आहेत. ए, ऐ, ओ, औ, हे स्वर व हे स्वर असलेलीं अक्षरें नेहमींच **गुरु** असतात.

**१. अपवाद**—अनुस्वार, व जोडाक्षर यांपूर्वींच्या अक्षरांवर उच्चार-णांत जोर असतो त्यावेळींच तीं **गुरु** असतात; जोर नसल्यास त्यांस गुरुत्व येत नाहीं. उदा०—" **जं**व चाले मोठा धंदा, **तं**व बहि**ण** म्हणे दादा " येथें 'ज,' 'त,' यांवर अनुस्वार; व 'ण'च्यापुढें जोडाक्षर असूनही त्या अक्षरांवर उच्चारण्यांत जोर नसल्यामुळें तीं **गुरु** नाहींत.

**२. अपवाद**—केव्हां केव्हां कवि पद्याच्या जुळणीसाठीं ऱ्हस्व अक्षराचें उच्चारण लांबट करितात, तेव्हां त्यास **गुरु** अक्षर व दीर्घ अक्षराचें उच्चारण

आंखूड करितात, तेव्हां त्यास **लघु** अक्षर म्हणावयाचें. उदा० " मनीं धरिलेसें रूप अमं**गळ** " येथें शेवटचीं ' गळ ' हीं अक्षरें उच्चारण्यांत लांबट असल्यामुळें तीं **गुरु** आहेत; तसेंच " **गे**लें तुझ्यावर जडून **रा**मा मन० " यांत '**गे**' व '**रा**' हीं अक्षरें मूळचीं दीर्घ असलीं, तरी उच्चारणांत तीं आंखूड केल्यामुळें **लघु** आहेत.

( ३ ) र्‍हस्व अक्षराच्या उच्चारणास जो वेळ लागतो त्यास **मात्रा** म्हणतात. लघु अक्षराची एक मात्रा व गुरु अक्षराच्या दोन मात्रा.

( ४ ) लघु-गुरु-भेदानुसार पद्याचें मापन करण्यासाठीं तीन तीन अक्षरांचा किंवा चार चार मात्रांचा एकेक गट ठरविला आहे, त्यास "**गण**" म्हणतात. **अक्षरगण** व **मात्रागण** असे त्यांत दोन प्रकार आहेत. **अक्षरगण** खालीलप्रमाणें **आठ** आहेत, हें सर्वांस माहीतच आहे.

**य यमाचा, न नमन, त ताराप, र राधिका ।**
**म मानावा, स समरा, ज जनास, भ भास्कर ॥** ( प० गो० )

**मात्रागण** खालीलप्रमाणें **पांच** आहेत—

**द्विगुरु म-गण, ललग स-गण,**
**लगल ज-गण, गलल भ-गण, मनिं आणा ।**
**चारहि लघु तोचि न-गण,**
**ऐसे हे पांच गण जाणा ॥** ( प० गो० )

( ५ ) पद्यांत चरणाच्या शेवटीं थांबावें लागतें; मोठ्या वृत्तांत मध्यंतरींही थांबावें लागतें; त्या ठिकाणास **विराम** किंवा **यति** म्हणतात. ( यति = यम् + ति, हा मूळ स्त्रीलिंगी शब्द आहे; पण तो पुल्लिंगीच रूढ झाला आहे). उदा०—"कारंजें हें, छान आहे मजेचें । पाणी चाले ‖, शोभती बाग साचे " या शालिनी-वृत्तांत चौथ्या व सातव्या अक्षरापुढें थांबावें लागतें; म्हणून तेथें **यति** आहे.

**टीप**—यति असेल तेथें होतां होईतों पूर्ण शब्द होण्यास हवा; निदान शब्दाचे दोन सार्थ विभाग पडतील असें हवें; तसें नसल्यास **यति-भंग** हा दोष होतो. उदा०—" होउं दे का,रागृहाच्या, भिंतिची उं,ची किती " येथें '**का**' व '**उं**' ह्या अक्षरांचे ठिकाणीं **यति-भंग** झाला आहे.

( ६ ) मराठींतील पद्यरचनेंत जवळ जवळच्या दोन दोन चरणांच्या शेवटचीं एक वा अनेक अक्षरें क्रमानें सारखींच असतात; त्यास "**यमक**" असें म्हणतात. (पद्यलक्षणें ठरवितांना यमक कोठें असतें, त्याचीही जरूरी लागते). उदा०—

**वनीं देखतां मेघ-नीळास मोर।**
**प्रमोदें करी नृत्य-लीला समोर ॥**
**तयासारखे नाचती तोक सारे ।**
**खुणावूनि अन्योन्य कीं तो कसा रे ? ॥**

**टीप**—यमकाक्षरांपूर्वींचे स्वरही एकच असतील असें यमक असावें. धीट-वीट, चांग-सांग, थोर-मोर; परंतु धीट-नेट, थोर-कीर, असें नसावें. उ०-"वसती ज्या ठायीं दीनार्त **पतित** । विराजती **तेथ**, चरण तुझे "

( ७ ) मराठी पद्य-रचनेंत **अक्षर-वृत्तें**, व **मात्रा-वृत्तें**, असे दोन प्रकार पडतात. ज्यांतील प्रत्येक चरणांतील अक्षरें सारखीं असून, त्यांतील लघु गुरु-क्रमही सारखाच असतो, त्यांस **अक्षर-वृत्तें** म्हणतात; ( हीं बहुतेक संस्कृतांतून आलेलीं आहेत; ह्यांस **श्लोक-वृत्तें**ही म्हणतात ). ज्यांत अक्षरें ठराविक नसून, मात्रा मात्र ठराविकच असतात, त्यांस **मात्रा-वृत्तें** किंवा **जाति-वृत्तें** असें म्हणतात. मराठींतील **पदें** हीं **जातिवृत्तेंच** होत.

## अक्षर-वृत्तें

संस्कृतांत एका अक्षरापासून सव्वीस अक्षरांपर्यंतचीं **अक्षर-वृत्तें** आहेत. ( **श्री**–एकाक्षरी; **स्त्री**, **मही**, द्व्यक्षरी; **पांचाल**, **मृगेंद्र**, त्र्यक्षरी; इ० ). हीं वृत्तें काव्योपयोगी होत नाहींत; म्हणून आठ अक्षरांपासूनचीं मराठींत नेहमीं येणारीं अक्षर-वृत्तें व त्यांचीं लक्षणें येथें दिलीं आहेत. ( लक्षणांत अक्षरें, गण, यति व लघु-गुरु, यांचा समावेश होतो. )

अक्षर-वृत्तांत **समवृत्तें**, **अर्धसम-वृत्तें** व **विषम-वृत्तें** असे तीन प्रकार आढळतात. ज्याच्या चाऱ्ही चरणांचीं अक्षरें व लघु-गुरु-क्रम समान तें **सम-वृत्त**; ज्याचे १।३ व २।४ हे चरण समान तें **अर्ध-सम-वृत्त** व ज्याचे चाऱ्ही चरण भिन्नाक्षरांचे तें **विषम-वृत्त**; ( मराठींत विषम-वृत्तें नाहींत ).

## सम-वृत्तें

### १. अनुष्टुप् ( अक्षरें ८; य० पा० )

ह्यास गणांचा नियम नाहीं.

तमालपिष्टनीलांनीं । मेघांनीं नभ लिंपिलें ॥
संसक्तशीत-सुरभि । वातांनीं उपवीजिलें ॥

### २. विद्युन्माला ( अक्षरें ८; य० पा० )

गण-म, म व शेवटीं गुरु, गुरु.

मेघाली का ही आभाळीं । मृत्युच्छाया किंवा काळी ? ॥
का हा श्याम स्रष्टा आला ? । कंठीं ज्याच्या विद्युन्माला ॥

### ३. चंपकमाला ( अक्षरें १०; यति ५, ५ )

गण-भ, म, स, व शेवटीं गुरु.

गांजिति मातें, षड्रिपु भारी । सत्वर त्यातें, ईश निवारी ॥
पाहिं दयाळा, प्रेम-कटाक्षीं । दीन असें मी तूं मज रक्षीं ॥

### ४. कामदा ( अक्षरें १०; यति ५, ५ )

गण-र, य, ज व शेवटीं गुरु.

घोर हा नको, फार कष्टलों । स्वा हितास मी, व्यर्थ गुंतलों ॥
वारिं शीघ्र सं,सारयातना । हे दयानिधे, श्रीगजानना ॥ (प० ता०)

### ५. शुद्धकामदा ( अक्षरें ११; यति ६, ५ )

गण-न, र, र व शेवटीं लघु, गुरु

धरूं नका तुम्ही, आडवाट ती ।
करिल नाश कीं, खचित ही मती ॥
विनवितों तुम्हां, जाणतां तरी ।
सुजनता वसो, स्वात्म-मंदिरीं ॥

[ कामदा वृत्ताच्या पाहिल्या गुरु अक्षराऐवजीं दोन लघु अक्षरें आल्यानें, हें वृत्त होतें. ]

### ६. इंद्रवज्रा ( अक्षरें ११; य० पा० )

**गण–त, त, ज** व शेवटीं **गुरु, गुरु.**

**हे तों गुरू पापतरू म्हणावे । अंधासवें अंध तसे गणावे ॥**
**ते प्रीति रामीं गुरु तोच साच । श्रुत्यर्थ इत्यर्थ असे असाच** (वामन)

### ७. उपेंद्रवज्रा ( अक्षरें ११; य० पा० )

**गण–ज, त, ज** व शेवटीं **गुरु, गुरु.**

**तया वनीं एक तडाग तोयें । तुडुंबलें तामरसानपायें ॥**
**निरंतरामंद मरंद वाहे । तपांतही यास्तव रिक्त नोहे ॥** (र० पं०)

[ इंद्रवज्रेंत चरणाचें प्रथमाक्षर गुरु असतें व उपेंद्रवज्रेंत लघु असतें, एवढाच त्या दोहोंत फरक आहे. ]

### ८. शालिनी ( अक्षरें ११; यति ४, ७ )

**गण–म, त, त** व शेवटीं **गुरु, गुरु**

**कारंजें हें, छान आहे समोर । पाणी चाले, शोभती बाग फार**
**त्याच्या मध्यें, चक्र आहे मजेचें । पाणी तेथें, नागमोडींत नाचे**

### ९. रथोद्धता ( अक्षरें ११; य० पा० )

**गण–र, न, र** व शेवटीं **लघु, गुरु.**

**मोकळा करुनि कंठ तेधवां । आठवूनि मनिं जानकी-धवा ॥**
**ते रडे, भरतही तसा रडे । जोंवरी नयन होति कोरडे ॥** (वामन)

### १०. स्वागता ( अक्षरें ११; य० पा० )

**गण–र, न, भ** व शेवटीं **गुरु, गुरु.**

**एक ते सदय लेकुरवाळी । पोळतां शिशु तया कुरवाळी ॥**
**धावते हृदयिं त्यास धरोनी । जाय तो तडफडोनि मरोनी ॥**

### ११. मौक्तिकमाला ( ११; यति ५, ६ )

**गण–भ, त, न** व शेवटीं **गुरु, गुरु.**

**श्रीपति-पादां,बुज-नमनाला । आवड वाटे, बहुत मनाला ॥**
**यास्तव गाती, बुध-जन त्यातें । आवडि कां ती, मग नच मातें ?**

### १२. भुजंगप्रयात ( अक्षरें १२; यति ६,६ )

गण–य, य, य, य.

म्हणे तोंड दे हें, मला गोड खाया।
म्हणे नाक दे चां,गला वास घ्याया॥
मऊ चांगलें व,स्त्र हें अंग मागे।
स्वतांच्या हिता मं,डळी नित्य जागे॥ ( ओक )

### १३. द्रुतविलम्बित ( अक्षरें १२; य० पा० )

गण–न, भ, भ, र.

असुनि काय जिणें जगतीवरी। मनुज जो नच देश-हिता करी
फुकट अन्नचि खाउनि वाढतो। फुकट भार धरेवर घालतो

### १४. वंशस्थ ( अक्षरें १२; य० पा० )

गण–ज, त, ज, र.

लतेतळीं रुंद-निरुंद कालवे। गळोनि तेथें मकरंद कालवे॥
परागही सांद्र तयांत रंगती। फुलासवें भृंग-तती तरंगती॥

### १५. इंद्रवंशा ( अक्षरें १२; य० पा० )

गण–त, त, ज, र.

जेव्हांहि भाग्य-क्षय-दुर्दशा नरा।
येते अशी काळकृता सुदुर्धरा॥
घेतात मित्रेंहि अमित्रता तदा।
कंटाळती लोकहि रक्त जे सदा॥ ( पर० गो० )

[ वंशस्थांत प्रथमाक्षर लघु; इंद्रवंशेंत प्रथमाक्षर गुरु; एवढाच फरक. ]

### १६. प्रहर्षिणी ( अक्षरें १३; यति ३, १० )

गण–म, न, ज, र व शेवटीं गुरु.

गंगोत्री,वरुनि अशी वहात धन्या।
हे आल्या,वरि पुढती हिमाद्रि–कन्या॥
बाजूला, खडक असोनि उंच भारी।
वाहे त्यां,मधुनि तिचें विशुद्ध वारी॥ ( चिं० पेठकर )

### १७. वसंततिलका ( अक्षरें १४; य० पा० )

गण–त, भ, ज, ज व शेवटीं गुरु, गुरु.

ज्यांच्या गुणीं मुदित पंडित सर्व झाले।
गर्वोद्धतांसहि जिहीं मदहीन केलें॥
सर्वत्र ज्यांस जयपत्र मिळेच जाण।
ऐसें अतां लिहिल निःस्पृह लेख कोण ?॥ ( लेंभे )

### १८. मालिनी ( अक्षरें १५; यति ८, ७ )

गण–न, न, म, य, य.

तरुवर सुफलांच्या, आगमीं नम्र होती।
जलदहि जल-भारें, खालतीं फार येती॥
सुपुरुष विनयातें, भाग्यशाली धरीती।
उपकृति करित्यांची, जाणिजे हीच रीती॥ ( पर० गो० )

### १९. चामर ( अक्षरें १५; य० पा० )

गण–र, ज, र, ज, र.

अश्व देखतांचि बाळकासि चोज वाटलें।
रुक्म-रत्न-भूषणीं म्हणे कसें सु-शोभलें!
ते क्षणींच देखिली शिरीं सुवर्ण-पत्रिका।
पाहि बाळ वाचुनी बहूत अर्थ नेटका॥ ( आनंदतनय )

### २०. पंचचामर ( अक्षरें १६; य० पा० )

गण–ज, र, ज, र, ज व शेवटीं गुरु.

असें ऋषी वदे मुखें अचिंत तूं वसें सुखें।
कुमार पैल पातला दुरूनि कूश कौतुकें॥
कुशास देखुनी सिता रडोनि आळवी शुरा।
कुमार होय घाबरा पुसे नमूनि सुंदरा॥ ( आनंदतनय )

### २१. शिखरिणी ( अक्षरें १७; यति ६, ११ )

गण–य, म, न, स, भ व शेवटीं लघु, गुरु.

कदा नेणो ओढी, शरधिंतुनि काढी शर कदा ।
कदा धन्वी जोडी, वरिवरिहि सोडी तरि कदा ॥
विपक्षाच्या वक्षा,वरि विवर-लक्षास्तव रणीं ।
कळे राजेंद्राची, त्वरित-शरसंधान-करणी ॥ ( र० पं० )

### २२. पृथ्वी ( अक्षरें १७; यति ८, ९ )

गण–ज, स, ज, स, य व शेवटीं लघु, गुरु.

तुझ्या बहुत शोधिले, अघ-निधी पदाच्या रजें ।
न तें अनृत वर्णिती, बुध-जनीं सदाचार जे ॥
असे सतत ऐकते, सतत बोलते मीच ते ।
प्रमाण न म्हणों जरी, उचित माझिया नीचते ! ( मोरोपंत )

### २३. हरिणी ( अक्षरें १७; यति ६, ४, ७ )

गण–न, स, म, र, स व शेवटीं लघु, गुरु.

गृह-कलह हा, राज्यें लावी, लयास अनेक तीं ।
अहित घडवी, मोटें देशा, असें बुध सांगती ॥
कलह बुडवी, राज्या भाग्या, असा परिणाम हा ।
म्हणुनि कथितों, त्यातें टाका, यशा मिळवा महा ॥ ( ओक )

### २४. मन्दाक्रान्ता ( अक्षरें १७; यति ४, ६, ७ )

गण–म, भ, न, त, त व शेवटीं गुरु, गुरु.

मोठ्या खोट्या, छलक कुमती, बोलती दुष्ट वाचा ।
बोभाटा हा, अजवरि जगीं, गाजतो सासवांचा ॥
ऐशा खोट्या, विपरित मिषें, तूं न चित्ता विटाळीं ।
एक्या हातें, कधितरि मुली, वाजते काय टाळी ? ॥(आठल्ये)

## २५. शार्दूलविक्रीडित ( अक्षरें १९; यति० १२, ७ )

**गण**–म, स, ज, स, त, त व शेवटीं गुरु.

आकाशांत फुलें धरेवर फुलें, वाऱ्यावरीही फुलें ।
माझ्या गेहिं फुलें वनांतहि फुलें, भूगर्भि सारीं फुलें ॥
माझें चित्त भुले सुगंधित भलें, हें विश्व हो जाहलें ।
कोणाला कळलें? किती पसरलें, उद्यान हें शोभलें! ॥ (टिळक)

## २६. स्रग्धरा ( अक्षरें २१; यति ७, ७, ७ )

**गण**—म, र, भ, न, य, य, य.

मी भक्ताधीन भक्त, प्रिय मज न तसें, आवडे अन्य काय ।
श्री जेथें स्नान वाटे, तदधिक मजला, आपुला धन्य काय ॥
माझी सेवाचि मोक्षा,हुनिहि बहु मला, त्यासि जे अंतराय ।
ध्यानीं होऊं न देती, क्षणहि बहु मला, मान्य ते सन्त-राय॥
( मोरोपंत )

## २७. अमृतध्वनि (अक्षरें २२; यति ४, ७, ७, ४ )

**गण**—त, भ, य, ज, स, र, न व शेवटीं गुरु.

झाला सको,प पर जाला मुठा,ळुनि भुजांलागि था,पटि करें ।
घाला द्विजा,वरिच घालावया, यम निघाला स-वे,ग निकरें ॥
पाला सम,र्पित कृपाला म्हणु,नि तव पालाणुनी, निज-हला ।
आला मुनी,जवळि आलापितां,चि जाळिं आलाबुसा, उसळला!
( आनंदतनय )

## २८. मंदारमाला ( अक्षरें २२; यति ४, ६, ६, ६ )

**गण**–त, त, त, त, त, त, त, व शेवटीं गुरु.

सृष्टी तुला, वाहुनी धन्य मा,ते अशी रूपसं,पन्न तूं निस्तुला ।
तूं कामधे,नू खरी कल्पव,ल्ली सदा लोभला, लोक सारा तुला॥
त्या वैभवा,ला तुझ्या पाहुनी,यां मला स्फूर्ति नृ,त्यार्थ होते जरी
सामर्थ्य ना,मीं तुझ्या आर्यभू ,मी तसें पाहिलें,मी न कोठें तरी
( टिळक )

## २९. सुमन्दारमाला ( अक्षरें २३ )

[ मंदारमालेंतच आरंभीं एक लघु अक्षर वाढवून, २३ अक्षरांचें "**सुमन्दारमाला**" वृत्त तयार करण्यांत आलें आहे. ]

**मराठी असे आमुची मायबोली जरी आज ती राजभाषा नसे ।
नसे बाह्य ऐश्वर्य या माउलीला यशाची पुढें थोर आशा असे ॥
न मातब्बरी पञ्चखण्डान्तरीं ती जरी मान्यता पावली इङ्ग्रजी ।
भिकारीण आई जहाली म्हणूनी कुशींचा तिच्या तीस कैंवी त्यजी ?॥**

(मा० त्रिं० ५०)

## ३०. मदिरा ( अक्षरें २३; यति ६,६,६,५ )

**गण** सात भ-गण व शेवटीं **गुरु, गुरु**.

**नम्रपणेंच स,भेंत महोन्नत, जे गुण वर्णुनि,यां परक्याचे ।
सांगितल्याविण,दाविति कौशल,सर्व जनांप्रति, जे स्वगुणांचें
स्वार्थ-परार्थहि, साधिति जिंकिति,शान्तिबळें मुख,रत्व खलांचें
सन्त महागुण,-भाजन यापरि, सेवन कोण क,री न तयांचें ?॥**

[ मदिरेलाच कोणी **सवाई** असेंही म्हणतात. सवाईचे पहिली सवाई, दुसरी सवाई, तिसरी सवाई, असे प्रकार आहेत. ]

**१ ली सवाई.** मदिरेंतील १५ वें व १६ वें हीं अक्षरें लघु-गुरु असतात; त्यांऐवजीं गुरु-लघु करितात. ( अक्षरें २३ ).

**राम रघूत्तम काम रिपुप्रिय लोक-शोक-हर यापरि भावें ।**

**२ री सवाई.** पहिल्या सवाईंत प्रथमाक्षर गुरु असतें, त्याऐवजीं आरंभींच दोन लघु करितात; व शेवटचें अक्षर कमी करितात. ( अक्षरें २३ ).

**शिव-हृदयालय कीं सुखदायक निर्जर-नायक-सेव्य पदा ।**

**३ री सवाई.** मदिरेच्या आरंभीं आणखी २ लघु अक्षरें वाढवून, व शेवटचें कमी करून, २४ अक्षरें करितात.

**हनुमंत जसा कपि सर्व तसे गिरि चालविती कुळ पर्वतसे ।**

[समान अक्षरांच्या वृत्तांच्या चरणांचें मिश्रण करून,केव्हां केव्हां पोटवृत्त तयार करितात, त्यास **उपजातिवृत्त** असें म्हणतात इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा, वंशस्थ व इंद्रवंशा, स्वागता व रथोद्धता यांच्या मिश्रणानें अशीं वृत्तें होऊं शकतात. ]

## अर्धसम–वृत्तें

### १. वियोगिनी किंवा वैतालीय ( अक्षरें १० व ११ )

विषमचरण—अक्षरें १०. **गण–स, स, ज**, व शेवटीं **गुरु.**

समचरण—अक्षरें ११. **गण–स, भ, र** व शेवटीं **लघु, गुरु.**

**प्रभु राम सखा निकेतनीं । मजला त्यागुनि जातसे वनीं ॥**
**गमतें जग शून्य मन्मनीं । धरुं मी प्राण कसे वियोगिनी ? ॥**

### २. माल्यभारा ( अक्षरें ११ व १२ )

विषमचरण—अक्षरें ११. **गण–स, स, ज** व **गुरु, गुरु.**

समचरण—अक्षरें १२. **गण–स, भ, र, य.**

**नळराज-कथा सुधाचि साजे । दमयंती वर-वर्णिनी विराजे ॥**
**मिळणी उभयांसि होय जेथें । अधिकारी अधिकानुराग तेथें ॥**

## मराठी–वृत्तें

मराठीमध्यें ओवी, अभंग, दिंडी व साकी हीं संस्कृतमधून न आलेलीं वृत्तें आहेत; आणि आर्या व तिचे प्रकार हे मात्र संस्कृतांतून आलेले आहेत. पहिल्या चारांपैकीं ओवी व अभंग हीं **अक्षर–वृत्तें** व दिंडी, साकी, आर्या, हीं **मात्रा–वृत्तें** आहेत.

### १. ओवी

मराठींत हा पद्य-प्रकार अगदीं जुना महानुभावांच्या वेळेपासूनचा आहे. अगदीं आरंभींची मराठी पद्यरचना ओवी-वृत्तांतच झाली. ज्ञानेश्वरानें तिला अलंकारादिकांनीं नटवून व अर्थानें गौरवून पूर्णतेस आणिलें; म्हणून “ **ओवी ज्ञानेशाची** ” असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे.

ओवीच्या अक्षरांची संख्या मोरोपंताशिवाय दुसऱ्या कोणीं कडकपणें पाळलेली आढळून येत नाहीं. पहिल्या तीन चरणांत ६ ते १८ अक्षरें व चौथ्या चरणांत ४ ते १२ अक्षरेंहि येतात. ह्या वृत्ताचे एकंदर चार मुख्य प्रकार आढळतात. (१)**ज्ञानेश्वरी ओवी**, (२) **एकनाथी ओवी**, (३) **झोपाळयावरील** स्त्रियांनीं म्हणण्याची **ओवी** व (४) ‘**अंगाई-गीत**’ या प्रकारची **ओवी.** यांविषयीं आतां क्रमानें विवेचन करूं.

## ज्ञानेश्वरी ओवी

ह्या ओवींत पहिल्या तीन चरणांत सामान्यतः आठ अक्षरें व शेवटच्या चरणांत चार अक्षरें असतात; ( परंतु हा नियम पाळला जात मात्र नाहीं ). पहिल्या तीन चरणांचे अंतीं यमक असतें. एकनाथी ओव्यांपेक्षां ही आंखूड असते. उदा०—

**(१) जो सर्वां भूतांचे ठायीं । द्वेषातें नेणेचि कांहीं ।**
**आपपर जया नाहीं । चैतन्या जैसें ॥** ( ज्ञानेश्वर )
**(२) आतां वंदूं कवीश्वर । जे शब्दसृष्टीचे ईश्वर ।**
**नातरी हे परमेश्वर । वंदावे ते ॥** (रामदास)

## एकनाथी ओवी

ही ओवी अक्षरसंख्येनें ज्ञानेश्वरी ओवीपेक्षां लांबट असते. पहिले तीन चरण व चवथ्याचें अर्ध यांचे शेवटीं यमक असतें. उदा०-

**(१)पडतां वानरांचें अनुमोदन । स्वयें पुसे रघुनंदन ।**
**शिष्ट पाठवावा कोण । तें निवडोन,सांगा मज ॥**(एक०)
**(२)करीं वीणा घेवोनी ब्रह्मसुत । शिवाजवळी आला अकस्मात ।**
**म्हणे हे विश्वंभर विश्वनाथ । तुझे भक्त देखिले ॥** (श्रीधर)

## झोपाळ्यावरील ओवी

यांत प्रत्येक चरणांत सहा किंवा आठ अक्षरें असे तीन चरण असून, चवथा चरण चार अक्षरांचा असतो. क्वचित् सात अक्षरेंही कांहीं चरणांत असूं शकतात. दुसऱ्या व तिसऱ्या चरणांचे शेवटीं यमक असतें. ह्या प्रकारची शास्त्रशुद्ध रचना प्रथम मोरोपंतानें केली. बारामती-करांच्या मुली-बाळींना झोपाळ्यावर बसून म्हणण्यासाठीं त्यानें सीता-गीत, सावित्री-गीत व रुक्मिणी-गीत ह्या ओव्या करून दिल्या. ( षडक्षरी अभंगांप्रमाणें त्या दिसतात, परंतु त्या ओव्याच आहेत —पांगारकर ). उदा०—

**(१) पहिली माझी ओवी । पहिला माझा नेम**
**तुळशीखालीं राम । पोथी वाची** ( लौकिक )
**(२) गाई घरा आल्या । घण घण घंटानाद ।**
**कुणीकडे घालूं साद ? । गोविंदा रे** ( मायदेव )

(३) यज्ञासाठीं भूमी । नांगरीतां धन्या ।
सांपडली कन्या । सीतादेवी (मोरो०)
(४) संतांपासूनीयां । संतां भय झालें ।
ऐसें कानां आलें । नाहीं कधीं (मोरो०)

## ‘अंगाई-गीत’ ओवी.

वरच्या ओव्यांतलि चतुरक्षरी ४ था चरण काढून टाकिला म्हणजे ह्या प्रकारची ओवी होते. मात्र तीन चरण झाल्याबरोबर अपूर्ण वाटूं नये म्हणून म्हणण्याची चाल निराळी असते. ती मधुर असल्यामुळें आतां ह्या ओवीचा प्रचार आधुनिक कवींच्या काव्यांत बराच होऊं लागला आहे. उदा०—

बहीण आपल्या भावास निजवितांना म्हणते—

**आकाशींच्या अंतराळीं । तारकांना तेज चढे ।**
**तुझी माझी प्रीती जडे ॥ १ ॥**
**परसांतल्या फुलांचा । वास कोनाकोनीं खुले ।**
**तुझा माझा श्वास मिळे ॥ २ ॥**
**रातकीडे गीत गाती । ‘अंगाई’ फुलांना लागे ।**
**आतां तूं मी नको जागें ॥ ३ ॥**
(अनिल)

## २. अभंग

ओवीप्रमाणेंच **अभंग** हा निवळ मराठी पद्य-प्रकार आहे. पुष्कळांनीं अभंग केले आहेत, पण त्या सर्वांत तुकारामाचे अभंग सरस असल्यामुळें “**अभंग-वाणी प्रसिद्ध तुकयाची**” असें म्हणण्याची चाल पडली आहे. अभंगांत द्विचरणी व चतुश्चरणी असे मुख्य दोन प्रकार असून, अक्षर-भेद व यमक-भेद यांमुळें आणखी पुष्कळ उपप्रकार पडले आहेत.

### द्विचरणी अभंग.

याच्या पहिल्या प्रकारांत दोन्ही चरणात आठ आठ अक्षरें असून, पहिल्या व दुसऱ्या चरणाचे अंतीं यमक असतें. दुसऱ्या प्रकारांत पहिल्या चरणाचा शेवट व दुसऱ्या चरणाचें चौथें अक्षर (क्वचित् पांचवें) ह्या ठिकाणीं यमक असतें. उदा०—

**(१) कई व्हावें जीवन । कई पलंगीं शयन ॥ १ ॥**
**जैशी जैशी वेळ पडे । तैसें तैसें होणें घडे ॥ २ ॥** (तुका०)

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं माझा भावो ॥ १ ॥
चरण न सोडीं सर्वथा । आण तुझी पंढरिनाथा ॥२॥ (नाम०)

( २ ) ब्रह्मरस घेई काढा । तेणें पीडा, वारेल ॥ १ ॥
पथ्य नाम विठोबाचें । आणिक वाचे, न सेवीं ॥ २ ॥
तेथें पंक्तिभेद नाहीं । मोठें कांहीं, लहान ॥ ३ ॥ ( तुका० )

### चतुश्चरणी अभंग.

याच्या पहिल्या प्रकारांत पहिले तीन चरण षडक्षरी असून, चौथा चरण चतुरक्षरी असतो; व दुसऱ्या आणि तिसऱ्या चरणांच्या शेवटीं यमक असतें. दुसऱ्या प्रकारांत पहिल्या तीन चरणांत आठ व चौथ्या चरणांत सामान्यतः सात अक्षरें असून, साडेतीन चरणांचे अंतीं यमक असतें. उदा०—

( १ ) नाहीं संतपण । मिळत हें हाटीं ।
हिंडतां कपाटीं । रानीं, वनीं ॥ १ ॥
न ये मोल देतां । धनाचिया राशी ।
नाहीं तें आकाशीं । पाताळीं तें ॥ २ ॥
तुका म्हणे आहे । आपुल्या तें अंगीं ।
गवसेना जगीं । दुजे ठायीं ॥ ३ ॥ ( तुकाराम )

( २ ) मन करारे प्रसन्न । सर्व सिद्धींचें कारण ।
मोक्ष अथवा बंधन । सुख-समाधान, इच्छा ते ॥ १ ॥
मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली ।
मनें इच्छा पुरविली । मन माउली सकळांची ॥२॥ (तुका०)

## ओवी व अभंग यांतील विशेष

**ओवी** व **अभंग** ह्यांचें सामान्य स्वरूप एकच आहे. म्हणजे बहुतेक चतुश्चरणी ओव्या व अभंग ह्यांतील पहिल्या तीन चरणांत ६ किंवा ८ अक्षरें असावयाचीं आणि चौथ्या चरणांत सामान्यतः चार अक्षरें असावयाचीं. परंतु ओवीचे बाबतींत हा निर्बन्ध बहुतेक झुगारून दिल्यासारखाच आढळून येतो. एकनाथांनीं तर ओवीला अक्षरांचे बाबतींत खूपच ऐसपैस केली आहे. अभंगांत मात्र अक्षरांचें नियमन ओवीपेक्षां ज्यास्त पाळलेलें आढळतें; तरी शैथिल्यही कमी नाहीं; हें अक्षरांसंबंधीं झालें.

सहा किंवा आठ अक्षरी चतुश्चरणी ओव्या व अभंग यांत यमकदृष्टयाही साम्य आढळतें; परंतु अभंग व ओवी ह्यांच्या म्हणण्याच्या चालींत मात्र फरक आहे. तसेंच अभंग विशेषतः पुरुषांच्या तोंडीं किंवा भजनाच्या वेळीं म्हटले जातात; व मोरोपंती 'सीतागीता'सारख्या ओव्या विशेषतः बायकांच्या तोंडीं व पुष्कळदां झोपाळ्यावर बसून म्हटल्या जातात. अर्थाच्या दृष्टीनें ओवी एक प्रकारें स्वतंत्र असते, तर एका संपूर्ण अभंगांत एकादें तत्त्व सांगितलेलें असतें;हा मोठा फरक आहे. शिवाय ओव्या सबंध प्रकरण संपेपर्यंत त्यांत हव्या तेवढ्या येऊं शकतात व त्यांचा अर्थदृष्टया मागल्यांचा पुढल्याशीं संबंध अव्याहत साखळीप्रमाणें जुळलेला असतो. अभंगांत प्रत्येक वेळीं भिन्नतत्त्वप्रतिपादन असल्यानें, त्यांमध्यें एकाचा दुसऱ्याशीं अर्थ-दृष्टया फारसा संबंध नसतो; व म्हणून एक अभंग व दुसरा अभंग ह्यांत विराम घ्यावा लागतो.

## ३. घनाक्षरी

ओवी व घनाक्षरी यांत वस्तुतः फरक नाहीं. चार ओव्यांचा एकत्र समुच्चय म्हणजे घनाक्षरी. एक ओवी म्हणजे घनाक्षरीचा एक चरण आणि तसल्या चरणांचे अंतीं मात्र एकच यमक पाहिजे. उदा०—

**अहो कैकेयी हें काय। केलें तुवां हाय हाय।**
**न म्हणवे तुज माय। जन्मोजन्मीं वैरिणी ॥ १ ॥**
**सर्वजगदभिराम । वना धाडिला तो राम।**
**केलें विख्यात कुनाम। कीं हे पतिमारिणी ॥ २ ॥**
**तुझ्या वधें न अधर्म। तुज मारावें हा धर्म।**
**परी निंदील हें कर्म। राम पापकारिणी ॥ ३ ॥**
**नाहीं तरी प्राण आज्य। तुझे घालोनियां प्राज्य।**
**जाळोनियां सामराज्य। दाखवितों करणी ॥ ४ ॥**

(वामन)

## ४. दिंडी ( मात्रा १९; यति ९, व १० )

हें मराठींतील मात्रावृत्त आहे. हिला चार चरण असून, प्रत्येक चरणांत १९ मात्रा असतात. जवळजवळच्या दोन चरणांत किंवा चाऱ्ही चरणांत यमक असतें. प्रत्येक चरणाच्या ९ व्या मात्रेवर यति असतो; ह्यामुळें ९ व १० मात्रांचे

असे दोन भाग एकेका चरणांत पडतात. याचा समावेश षण्मात्रिक जातिवृत्तांत असून ( ३।६।६।४ ) असे मात्रांचे गट पडतील. उदा०—

**कथा बोलूं हे, मधुर-सुधा-धारा।**
**होय शृंगारा, करुण-रसा थारा॥**
**निषध-राजा नळ, नामधेय होता।**
**वीरसेनाचा, तनय महा-होता॥** ( रघु० पं० )

**५. साकी** ( मात्रा २८; १६ व १२ )

हेंही षण्मात्रिक मराठी मात्रावृत्त असून, त्याला दोन अर्धें किंवा चरण असतात; आणि प्रत्येक अर्धांत २८ मात्रा असतात. १६ व्या मात्रेपुढें यति असतो. यांत ४ मात्रांचा एकेक गण याप्रमाणें ७ गण स्वतंत्रपणें मोजतां आले पाहिजेत. उदा०—

**हरिचा सखा सुदामा ब्राह्मण, निःस्पृह आत्म-ज्ञानी।**
**होता गृहीं यदृच्छा-लाभें, परम सुखातें मानी॥** ( मोरोपंत )

## आर्या

मोरोपंतानें **आर्या** म्हणजे **गीति** हिचा पुष्कळच प्रसार मराठींत केला. मूळांत आर्या व गीति यांत फरक आहे; परंतु गीतीलाच 'आर्या' असें म्हणूं लागले. याचा षण्मात्रिक जातिवृत्तांत समावेश होईल.

**६. आर्या** ( मात्रा विषमचरणीं १२ व समचरणीं १८, १५ )

**ती तातास म्हणे कच, गुरुभक्त साधु कुलीन कार्यकर॥**
**परि त्यासि सोडिलें जळ, जळ सोडूं मजहि आर्यकर॥**

**७. गीति** ( मात्रा विषमचरणीं १२ व समचरणीं १८ )

**शल्य म्हणे राधेया, जेव्हां तुझिया स्मरोनि कर्मातें॥**
**अर्जुन तीव्र शरांनीं, समरीं भेदील सर्व मर्मातें॥** (मोरो०)

———

## मात्रा–वृत्तें ( जाति–वृत्तें )

मराठींत ज्यांना आपण सामान्यतः '**पदें**' असें म्हणतों, त्यांचा मात्रावृत्तांत किंवा जातिवृत्तांमध्यें समावेश होतो. गाण्याच्या हरतऱ्हेच्या चालींवर व तालावर त्यांची रचना असल्यामुळें, पदें असंख्य प्रकारचीं होऊं शकतील. एकनाथाच्या

वेळेपासून मराठींत ही पद-रचना झालेली आढळते; परन्तु त्यांचें वर्गीकरण करून त्यांना शास्त्रांत स्थल देण्याचें कार्य आतांपर्यंत होऊं शकलें नाहीं; ती वेळ आतां आलेली आहे. कीर्तनांतून, नाटकांतून, प्रख्यात गवयांच्या तोंडून किंवा सुप्रसिद्ध आधुनिक कवि-गायकांच्या मुखांतून, हजारों लोक प्रत्यहीं जीं पदें ऐकून तल्लीन होऊन जातात, त्या पदांसंबंधीं ग्रंथांत कांहीं शास्त्रशुद्ध योजना हवीच; किंबहुना मराठी वाङ्मय अनेक अंगांनीं संपन्न होत असतां ह्याच बाबतींत वैगुण्य राहणें इष्ट नाहीं; प्रो० **माधवराव पटवर्धन** ह्यांनीं '**छन्दोरचने**'त ह्यासंबंधाचा बराच शास्त्रशुद्ध विचार केला आहे, त्यास अनुसरून येथें सोप्या भाषेंत आवश्यक तेवढें विवेचन केलें आहे.

**मात्रा-वृत्तांत** किंवा '**जाति-वृत्तां**'त फक्त '**पदां**'चाच समावेश होतो असें नाहीं; तर निरनिराळ्या रसांकरितां व प्रसंगांकरितां जी पद्य-रचना केलेली असते, तिचाही त्यांत समावेश होतो. म्हणजे वर्णनात्मक गोष्टींकरितां **कटावांचा** व उपदेशात्मक गोष्टींकरितां **फटके** यांचा विशेष उपयोग होतो; वीररसात्मक गोष्टींकरितां **पोवाडे** रचिले जातात, **लावण्या** विशेषतः शृंगाररसपोषक असतात; तरी त्यांच्या आकर्षक चालींमुळें भक्तिरसप्रधानही सुन्दर लावण्या झालेल्या आहेत; **भूपाळ्या** ह्या वस्तुतः ' भूपाळी ' ह्या रागांत म्हणण्याचें पद्य होय; **अंगाई-गीतें**, **पाळणे**, इ० स्त्रियांनीं म्हणावयाचीं गीतें आहेत; **आरत्या** विशिष्ट उत्सव-प्रसंगीं म्हणण्यांत येतात; निरनिराळ्या जातींच्या लोकांचीं निरनिराळ्या प्रकारचीं व निरनिराळ्या ढंगांचीं द्योतक अशीं पद्यें आहेत; ह्यांपैकीं फक्त नागर-जनांच्याच नित्य गायनांत येणाऱ्या प्रमुख प्रकारांसंबंधीं येथें दिग्दर्शन केलें आहे.

अक्षर-वृत्तामध्यें ज्याप्रमाणें सम-वृत्तें, अर्धसम-वृत्तें व विषम-वृत्तें असे प्रकार आहेत, त्याचप्रमाणें जाति-वृत्तांमध्येंही एकाच मात्रावलींचीं युग्मकें, कांहीं भाग एका मात्रावलींचा व कांहीं भाग निराळ्या मात्रावलींचा अशीं युग्मकें, व भिन्न भिन्न मात्रावलींचीं युग्मकें, असे प्रकार आहेत. तसेंच ह्यांपैकीं कांहींत ध्रुवपद व अंतरा असतो, कांहींत ह्या गोष्टी नसतात, इ० प्रकार आहेत. ह्यांचा अनुक्रम खालीलप्रमाणें—

**प्रथम** एक किंवा दोन चरणांचें ध्रुवपद, नंतर त्याच मात्रावलींचीं कांहीं युग्मकें, नंतर चाल बदलून म्हणावयाचे तीन, चार किंवा त्यांपेक्षां अधिक

ओळींचे अंतरे, आणि शेवटीं एक किंवा दोन चरणांनीं कडव्याचा शेवट असतो. **अंतरे** खालील प्रकारचे आढळतात. पुढील विषयाच्या नीट समजुतीसाठीं ते येथें स्वतंत्रपणें देतों.

१. **पद्म** किंवा **मनोरम** ( मात्रा ८ ). [ टिळकांच्या ' कवीची विनवणी ' यांतल्याप्रमाणें ]

हीं निःश्वसितें
कोण सोडितें ?
मम हृदयीं तें ।

२. **प्रविसूर्यकान्त** किंवा **चन्द्रकला** ( मात्रा १३ ). [ माधवानुजांच्या कृष्णा-कोयना-संगम ' यांतल्याप्रमाणें ]

किति विशाल तट हा अहा ।
प्रिय सखे, उभी तूं रहा ।
क्षण येथिल शोभा पहा ।

३. **शारदा** ( मात्रा ५ व ८ =१३ ).

मावळे,
जयांनीं दिले,
आपले गळे,
देश-रक्षणीं ।

४. **बालानंद** ( मात्रा १४ ). [ ह० ना० आपटे यांच्या 'असारजीवित केवळ माया०' यांतल्याप्रमाणें ]

मुकीं विचारीं, कुणीं हका ।
अशीं मेंढरें, बनूं नका ।
गत काळाचा, शोक फुका ।

५. **उद्धव** ( मात्रा १४ ). [ गडकऱ्यांच्या 'राजहंस माझा निजला०' यांतल्याप्रमाणें ]

नयनांच्या शिंपांमधुनी ।
अश्रूंचे मौक्तिक-सुमणी ।
मीं दिले तया काढोनी ।

६. **पादाकुलक** ( मात्रा १६ ). [ अज्ञातवासींच्या 'सरदार धन्य एवढा०' यांतल्याप्रमाणें ]

**अवघड गड अस्मानी डोले।**
**वरतीं बघतां फिरतिल डोळे।**
**खालीं पाताळांतिल इमले।**

७. **भूपतिवैभव** ( मात्रा १४ व ५ =१९ ). [ मृच्छकटिकांतील 'भूपती खरे ते०' यांतल्याप्रमाणें ]

**म्हणुनि कां त्यांसि सेवावें?—सांग तूं,**
**धनचि कां अधिक मानावें?—सांग तूं,**
**गुण त्यांचे कां न बघावे?—सांग तूं,**

८. **मंजरी** ( मात्रा २१ व ५ = २६ ).

**मोत्यांचे दाणे भरले कणसांत या—रे सख्या,**
**लवलीं हीं खालीं कितितरि भारें तया—रे सख्या,**
**आनंदें डुलतिल पावा परिसोनियां—रे सख्या,**

**टीप**—यांत २१ मात्रांनंतर 'रे सख्या' ह्याप्रमाणें पंचमात्रिक अक्षरें असतात; कांहीं अन्तऱ्यांमध्यें अशा प्रकारचीं अक्षरें अगोदरही असतात.

तालाच्या दृष्टीनें षण्मात्रिक तालीय म्हणजे सहा सहा मात्रांच्या एक एक गटानंतर टाळी येणारीं व अष्टमात्रिक तालीय म्हणजे आठ आठ मात्रांच्या एक एक गटानंतर टाळी येणारीं अशीं जातिवृत्तें असतात; त्यांचा क्रमानें विचार करूं.

## षण्मात्रिक जातिवृत्तें

### १. दासी ( मात्रा २४ )

यांत ६।६ मात्रांचा एकेक गट पडेल असे चार गट असतात. यति चरणाच्या शेवटीं असल्यामुळें तें अक्षर गुरु हवें. ( मृच्छकटिकांतील खालील सुप्रसिद्ध पद्यावरून हें नांव पडलें आहे ).

**दासि पेसें। मानुनियां । कार्य मला । सांगतसे ॥**
**सुदिन काय। उगवलाऽ । आज मनीं । वाटतसे ॥ ध्रु०॥**
**मधुर जाति। सुमनांचा । वास यास । येत असे ॥**
**उत्सव-भर । म्हणुनि याचा । खास अजुनि । पूर्ण असे १**

यांत १ ल्या व ४ थ्या चरणांत एकेक मात्रा वाढत होती, त्यांचें उच्चारण कवीनें ऱ्हस्व करून, ६ मात्रांचा गट केला. तसेंच दुसऱ्या चरणांत एक मात्रा कमी पडत होती, ती कवीनें एका मात्रेच्या आलापानें भरून काढली आहे; हें वर त्या त्या ठिकाणीं खुणा केल्या आहेत त्यांवरून कळून येईलच.

## २. जलधारा ( मात्रा २० )

यांतील ध्रुवपदांत ६।६ मात्रांचे तीन गट व शेवटीं एक गुरु अक्षर असतें; म्हणजे ध्रुवपदांत एकूण २० मात्रांचा एक चरण असे दोन चरण असतात; ठेका जुळण्यासाठीं चरणांतील शेवटचें अक्षर आलापांनीं ४ मात्रांइतकें वाढवितात. ध्रुवपदाच्या चरणाशीं जुळणारा २० मात्रांचा शेवटीं एकच चरण येतो. ( मृच्छकटिकांतील खालील पद्यांतील '**जलधारा**' या शब्दावरून हें नांव पडलें आहे).

**नोहे हा । पवन जवन । वारु भास- । तो ऽऽऽऽ ॥**
**जल-धारा । शर-भारचि । काय वर्ष- । तो ऽऽऽऽ ॥ ध्रु० ॥**
**गर्जत घन- । भेरि महा । चपला-ध्वज । झळकत हा ॥**
**हरुनि मेघ । भूप पहा । नेतो शशि- । करसमुहा ॥**
**जेंवि सबल । नृप पर-कर- । भार नेत । तो ऽऽऽऽ ॥ १ ॥**

**टीप**—तालबद्धतेसाठीं आलापांनीं ज्या मात्रा भरून काढितात, त्या हिशेबांत न घेतां, फक्त पद्यांतील अक्षरांच्या योगानें जेवढ्या मात्रा त्या पद्यांत येतात; तेवढ्या मात्रांचें तें पद्य, असें या ग्रंथांत सर्वत्र मानिलें आहे.

## ३. वैशाख ( मात्रा २२ )

अगदीं आरंभींच दोन मात्रा येतील अशीं अक्षरें घालून, पुढें जलधारेच्या ओळी जोडल्या कीं हें वृत्त होतें. शेवटीं सहा मात्रा पूर्ण होण्यासाठीं शेवटचें अक्षर व आरंभींच्या दोन मात्रा यांमधील उरलेल्या दोन मात्रा आलापांनीं भरून काढितात. ( सौभद्रांतील खालील पद्यावरून हें नांव दिलें आहे )

**वै । शाख-मासिं । वासन्तिक । समय शोभ- । ला ऽऽ ॥**
**ऽऽ । आम्रासव । पिउनि गान । करिति कोकि- । ळा ऽऽ ॥ १ ॥**
**या । जाइ-जुई । मोगरिला । बहर जो आ । ला ऽऽ ॥**
**गुं- । जारव कर- । ण्यांत गुंग । मधुप जाह- । ला ऽऽ ॥ २ ॥**

## ४. रमणी ( मात्रा २९ )

यांत ६।६ मात्रांचे तीन गट प्रथम येऊन, पुढें एक ६ मात्रांचा व एक ५ मात्रांचा मिळून ११ मात्रा भरतील असे दोन गट ध्रुवपदांत येतात. त्यानंतर अंतऱ्यादाखल सहा-सहा मात्रांचीं तीन युग्मकें म्हणजे जोड्या येतात; व ध्रुव-पदाला जुळण्यासाठीं ध्रुवपदांतील शेवटच्या अर्धाप्रमाणें ( ६ व ५ ) मात्रांचे दोन गट येतात. ( विनायकाच्या याच चालीमधील ' जोहार ' या कवितेंतील **रमणी** ह्या शब्दावरून हें नांव पडलें आहे. )

**प्रिये पहा। रात्रीचा। समय सरुनि।**
**येत उषः-। काल हाऽ ॥ध्रु०॥**

**थंड गार। वात सुटत।**
**दीप-तेज। मन्द होत।**
**दिग्वदनें। स्वच्छ करित।**
**अरुण पसरि। निज महाऽ ॥ १ ॥**

## ५. अवनी ( मात्रा २२ )

यांत सहा मात्रांचे तीन गट व चौथा गट चार मात्रांचा मिळून एकेका चरणांत २२ मात्रा भरतील अशा दोन चरणांचें ध्रुवपद असतें. नंतर **रमणी**प्रमाणेंच ६।६ मात्रांचीं तीन युग्मकें किंवा जोड्या अंतऱ्यामध्यें येतात; व शेवटीं (६ व ४) मात्रांचे दोन गट येऊन ध्रुवपदाशीं मेळ घालून दिला जातो. ( रेंदाळकरांच्या खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे:).

**उघडि नयन। रम्य उषा। हसत हसत। आऽऽली ॥**
**अरुण-किरण-। मय वसना। अवनी ही। दयाऽऽली ॥ध्रु०॥**

**खग कूजित। अलि गुञ्जित।**
**लतिका-तरु-। गण सिञ्चित।**
**मुदति विफल। सकल गमत।**
**--तुजविण या। काऽऽलीं॥ उघडि०॥**

## ६. बुल्बुल ( मात्रा २० )

यांतही ६।६ मात्रांचे पहिले तीन गट व चौथ्यांत मात्र एकच गुरु याप्रमाणें ध्रुवपदाचा एकच चरण असतो; अंतराही रमणीप्रमाणेंच ६।६ मात्रांच्या तीन युग्मकांचा असतो; व शेवटीं मात्र ६ मात्रांचा एक गट आणि एक गुरु अक्षर येऊन ध्रुवपदाशीं मेळ घातला असतो. ( तांब्यांच्या खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे. )

**उगिच काय । बुल्बुलाऽ । शिणविसी ग- । ळाऽऽऽऽऽ ॥ध्रु०।**
**उगिच कण्ठ । फोडिशीऽ ।**
**हृदय मात्र । फाडिशीऽ ।**
**रमणि-वाणि । आणिशीऽ ।**
**स्मरणि मंजु— । ळाऽऽऽऽ ॥ उगिच० ॥**

## अष्टमात्रिक जातिवृत्तें

यांत आठ आठ मात्रांचा एक एक गट अशीं अनेक आवर्तनें असतात; कमी पडलेल्या मात्रा जरूर तेथें आलापांनीं भरून काढितात. आतां यापुढें प्रत्यक्ष मात्रा मोजून न दाखवितां, लक्षण व उदाहरण तेवढेंच देतों.

## १. बालानंद ( मात्रा १४ )

यांत एकेका चरणांत ८ व ६ मात्रांचे दोन गट असतात. अंतरा केव्हां असतो, केव्हां नसतो. असल्यास त्याच्या ८ मात्रांच्या तीन ओळी असतात. ( बालकवीच्या खालील पद्यावरून हें नांव देण्यांत आलें आहे. )

**आनंदी आनंद गडे । इकडे तिकडे चोहिंकडे ॥**
**वरतीं खालीं मोद भरे । वायूसंगें मोद-भरें ॥**
**नभांत भरला ।**
**दिशांत फिरला ।**
**जगांत उरला ।**
**मोद विहरतो चोहिंकडे । आनंदी आनंद गडे ॥ १ ॥**

## २. उद्धव ( मात्रा १४ )

बालानंदांत ८ व ६ असे मात्रांचे दोन गट असतात, त्यांऐवजीं उद्धवांत ६ व ८ मात्रांचे दोन गट एकेका चरणांत असतात; अशा दोन चरणांमिळून ध्रुवपद होतें. अंतराही **उद्धवा**चाच असतो. शेवटीं ध्रुवपदाशीं जुळणारा १४ मात्रांचा एकच चरण घालून मेळ जुळविला जातो. ( ‘ मध्वमुनीं’च्या खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे. )

**उद्धवा, शांतवन कर जा । त्या गोकुलवासि जनांचें ॥ध्रु०॥**
**बा नंद यशोदा-माता । मजसाठीं त्यजितिल प्राण ॥**
**त्यागुनी प्रपंचा फिरती । मनिं उदास रानोरान ॥**
**अन्न-पाणि त्यजिलें रडती । अति दुःखित झाले दीन ॥**
**जन्मलों तेंहुनी झटले ।**
**मजलागीं तिळतिळ तुटले ।**
**कटि-खांदे वाहतां घटले ।**
**आटलें रक्त देहाचें ॥ उद्धवा शांतवन कर जा० ॥ १ ॥**

## ३. पादाकुलक ( मात्रा १६ )

यांत प्रत्येक चरणांत ८।८ मात्रांचे दोन गट अशीं चरणयुग्मकें येतात.

**हिरवे हिरवे, गार गालिचे ।**
**हरित तृणांच्या, मखमालीचे ।**
**त्या सुंदर मख,—मालीवरतीं ।**
**फुलराणी ही,—खेळत होती ।** ( बालकवि )

## ४. कटिबंध ( कटाव मात्रा १६ )

यांत आठ आठ मात्रांच्या दोन गटांचा म्हणजे १६ मात्रांचा एकेक तुकडा पडतो; व अशा तुकड्यांच्या शेवटीं यमक साधलेलें असतें. असे १६ मात्रांचे किती तुकडे असावेत याचा कांहीं नेम नाहीं. अशा कांहीं तुकड्यांत एक यमक आल्यानंतर पुढच्या कांहीं तुकड्यांत दुसरें यमक साधलेलें असतें. असाच प्रकार शेवटपर्यंत असतो. शीघ्रकवित्वास ही जाति फार सोयस्कर आहे.

सुरलोकाहुनि गंगा खालीं । भूमीवरि येण्यास निघाली ।
शर्व-जटीं ती उडीच घाली । देव-मंडळी पाहूं आली ।
फिरति विमानें दाटी झाली । मुनि-गण-संतति सर्व मिळाली ॥
जयोस्तु म्हणुनी स्तवनें करिती । सुरांगना ओवाळिति आरति ।
किन्नर टाकिति पुष्पें वरतीं । हा हा, हू हू, तुंबरु गाती ॥ १ ॥

## ५. **भूपतिवैभव** ( मात्रा २२ )

यांत ( २+८+८+४ ) मात्रांचे प्रत्येक चरणांत गट असतात; आणि (१४+५) मात्रांचा एकेक गट असलेल्या तीन ओळी असा अंतरा असतो. यास **भूपति-वैभवाचा** अंतरा असेंच म्हणतात. ( देवलांच्या मृच्छकटिक नाटकांतील खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे. )

भूपती खरे ते वैभव-सुख सेवीती ।
बहु दास सेवनीं दक्ष सदा राहाती ॥
म्हणुनि कां त्यांसि सेवावें ?—सांग तूं ।
धनचि कां अधिक मानावें ?—सांग तूं ।
गुण त्यांचे कां न वधावे ?—सांग तूं ।
संपत्ति-बळाच्या मदें धुंद ते होती ।
स्वच्छन्द वागती नाहिं तयां नय-रीती ॥ भूपती० ॥

## ६. **चंद्रकान्त** किंवा **सुलभा** ( मात्रा २६ )

साकीच्या चरणांतील एक अन्त्याक्षर कमी केल्यानें हें जातिवृत्त तयार होतें. अंतरा मंजरीचा( २१+५ ) मात्रांचा असतो. ( 'झुंजारराव' नाटकांतील 'चंद्रकांत राजाची कन्या०' या पद्यावरून हें नांव पडलें आहे. ) या वृत्तांत दीर्घ काव्यरचना करितां येत असल्यामुळें एकनाथापासून आतांपर्यंत विपुल रचना झालेली आहे.

घुमव घुमव एकदां फिरुनि तो गोड तुझा पावा ।
सोनें झालें शेत पिकुनि हें गातें मी धावा ॥
मोत्यांचे दाणे भरले कणसांत या—रे सख्या ।
लवलीं हीं खालीं कितितरि भारें तया—रे सख्या ।
आनन्दें डुलतिल पावा परिसोनियां—रे सख्या ।

**होति विलक्षण वृत्ति मनाच्या भुलति दुष्ट भावा।**
**फुंकाऱ्यासह जाति उडोनी क्रोध लोभ हेवा॥** (पावा-तांबे)
**टीप**—चंद्रकांत जातीच्या कांहीं पद्यांत अंतरा मुळींच नसतो.

## ७. सूर्यकांत किंवा राजसा (मात्रा २७)

साकींत चरणाचें उपान्त्य अक्षर गुरु असतें, तें लघु केल्यानें हें वृत्त होतें.

**सृष्टीचा लडिवाळ बाळ वेल्हाळ कवी धाकटा।**
**अफाट जग-हाटांत पाहिला हिरमुसला एकटा।**
**कळवळली कनवाळु मनीं असमाय माय-मावली।**
**बाजारांतुन काढुन माया-पाखर वर घातली॥**
**चंद्र-सूर्य खेळणीं दिलीं खेळाया तेजागळीं।**
**कुरवाळी हळुवारपणें पण न फुले कवि-मन-कळी॥** (Bee)

## ८. स्वर्गंगा किंवा फटका (मात्रा ३०)

यांतलि प्रत्येक चरणांत ८।८ मात्रांचे तीन गट असून, शेवटीं ६ मात्रा असतात. पहिले दोन चरण ध्रुवपदादाखल उपयोगी पडतात; व अशाच प्रकारचीं हवीं तेवढीं चरण-युग्मकें असतात. केव्हां केव्हां **बालानंद-जातीचा** (८ + ६) मात्रांचा अंतरा असतो. अंतऱ्यानंतर पहिल्यासारखेच एक किंवा दोन चरण शेवटीं येऊन कडवें पूर्ण होतें.

**बिकट वाट वहिवाट नसावी धोपट मार्गा सोडुं नको।**
**संसारामधिं ऐस आपला उगाच भटकत फिरूं नको॥**
**मायू-बापांवर रुसूं नको।**
**दूर एकला बसूं नको।**
**व्यवहारामधिं फसूं नको।**
**परी उलाढाली भलभलत्या पोटासाठीं करूं नको॥१॥** (अ०फं०)

## ९. सुन्दरा (मात्रा ३८; ५, ८, ८, ८ व ९)

यांत आरंभीं ५ मात्रांचा एक गट असून, पुढें आठ आठ मात्रांचे तीन गट व शेवटचा ९ मात्रांचा गट असतो; याप्रमाणें चरणांच्या जोड्या असून पहिले

दोन चरण ध्रुवपदादाखल उपयोगी पडतात. (रामजोशी यांच्या '**सुंदरा मनामधिं भरलि०**' या उत्कृष्ट पद्यावरून हें नांव या वृत्तास पडलें आहे ).

**श्रीमंत। प्रतापि बलवंत, कीर्ति आनंत-**
**बाळाजीपंत, पेशवे थोर ॥**
**भूपती। वाकती किती, चरण लक्षिती-**
**शब्द झेलिती, तयांचा जोर॥ ध्रु० ॥**
**चालले। अश्व फेंकिले, गजहि दौडिले-**
**वीर खौळले, जातिचे शूर ॥**
**मर्दना। रिपू-कन्दना, देश-तारणा-**
**कराया रणा, डोळयांवर धूर॥ १ ॥**

---

## भिन्न मात्रावलींचीं जाति-वृत्तें

### १. केशवकरणी (२७ व १६)

यांत दिडका चरण असून पहिल्या चरण-विभागांत सूर्यकान्त-जातीप्रमाणें (८+८+८+३)=२७ मात्रा असतात; व दुसऱ्या चरणविभागांत (५ +८+३)=१६ मात्रा असतात; अंतरा केव्हां असतो. केव्हां नसतो, ( रामजोशांच्या खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे. )

**केशवकरणी, अद्भुतलीला, नारायण तो, कसा—**
**तयाचा, सकल जनावर, ठसा ॥ ध्रु० ॥**
**माधव-महिमा, अगाध गोडी, गोविंदाच्या, रसा—**
**पीत जा, जिव होइल थं,डसा ॥**
**विष्णू म्हणतां, विकल्प जाती, मधुसुदनानें, कसा—**
**काढिला, मंथन-समयीं, जसा ॥ १ ॥**

### २. माधवकरणी ( २६ व १५ )

यांत पहिलें चरणार्ध केशवकरणीप्रमाणेंच पण शेवटीं १ मात्रेनें कमी म्हणजे २६ मात्रांचें असून, दुसरें चरणार्धही शेवटीं एका मात्रेनेंच कमी म्हणजे १५ मात्रांचें असतें; केव्हां केव्हां उद्धवाचा अंतरा असतो.

लोटी प्रल्हा,दास तातपिता, अग्निकटाहां,त-
अद्भुत, परि माधव-कर,णी ॥
अदाह्य भगव,द्भक्त तारता, देवाचा हा,त-
वाटिका, तिथ हो माधव,नीं ॥
देवाचा ला,डका मी न सखि, अणू अणू जळ,तो-
त्यांतही समाधान वा,टे ॥
एकतानता, परी भंगतां, जिव हा कळवळ,तो-
फुलांचे, मग बनती कां,टे ॥
म्हणून न माझी फिर्याद ।
न घेई, वा देई दाद ।
फिरेन मी जड,-मुक्त होउनी, नभीं अमर्या,द-
घेउनी, नित्य तुझा ना,द ॥ १ ॥ (छं०र०)

केव्हां केव्हां केशव-करणी व माधव-करणी यांचें मिश्रण आढळतें. ( " शिवरायाचा सिंह सिंहगडिं पडला समरांगणीं—मराठा गडी यशाचा धनी " यांतल्याप्रमाणें ).

## ३. मेनका ( १५ व २६ )

ही जाति माधवकरणीच्या चरणांच्या उलट अशा प्रकारची असून, तींत प्रथम-चरणार्ध १५ मात्रांचें व दुसरें चरणार्ध २६ मात्रांचें असतें. ( सौभद्रांतील " वसंतीं बघुनि मेनकेला० " या पद्यावरून हें नांव पडलें आहे )

पांखरा, येशिल का परतू,न—
मत्प्रेमानें, दिल्या खुणांतुन, एक तरी अठ,वून ॥ १ ॥
पांखरा, येशिल का परतू,न—
हवेसवें मिस,ळल्या माझिया, निःश्वासा वळ,खून ॥ २ ॥
पांखरा, येशिल का परतू,न -
वाऱ्यावरचा, तरंग चंचल, जाशिल तूं भड,कून ॥ ३ ॥ (टिळक)

## ४. श्रीरंग ( मात्रा ३० व २२ )

यांत प्रथम चरण आरंभींच दोन मात्रा ज्यास्त घेऊन, पुढें साकीप्रमाणें म्हणजे एकंदर ३० मात्रांचा असतो; व दुसरा चरण 'भूपती खरे ते०' याप्रमाणें

२२ मात्रांचा असतो. अंतरा असल्यास ( १४ + ५ ) एकोणीस मात्रांचा भूपतिवैभवाचाच असतो. शारदेंतील खालील पद्य या जातींतील आहे—

**यमपाश, गळ्याशीं ज्यास, लागला त्यास, मला कां देतां? ।**
**कां मांस विकुन, धर्मास वाकडे जातां? ॥**
**पाळिलें घातलें खाया—अजवरी ।**
**बकरीस मोल बहु याया—ज्यापरी ।**
**ही तुमचि मुलीवर माया—कां खरी? ।**
**जगतांत, सदय सकलांत, माउली-तात, मुलीला असतां ।**
**मग तुम्हीच इतके कठोर कां गे होतां? ॥**

## ५. अक्रूर ( मात्रा २० व १४ )

भूपतिवैभवांतील पहिल्या दोन मात्रा गाळून २० मात्रांचा प्रथम चरणार्ध व उद्धवाचा १४ मात्रांचा दुसरा चरणार्ध या जातींत असतो. अंतराहि उद्धवाचाच असतो. ( 'अजि अक्रूर हा नेतो श्रीकृष्णाला०' या पद्यावरून हें नांव दिलेलें आहे ).

**बा नीज गडे, नीज गडे लडिवाळा —**
**नीज नीज माझ्या बाळा ॥ ध्रु० ॥**
**रवि गेला रे, सोडुनि आकाशाला —**
**धन जैसें दुर्भाग्याला ॥**
**खडबड हे उंदिर करिती ।**
**कण शोधायातें फिरती ।**
**परि अंतीं निराश होती ।**
**लवकरि हेही, सोडितील सदनाला —**
**नीज नीज माझ्या बाळा ॥ १ ॥** ( द० कों० घाटे )

## ६. नृपममता ( मात्रा १४ व १९ )

यांत प्रथम-चरणार्ध उद्धव-जातीचें १४ मात्रांचें असून, द्वितीय चरणार्ध भूपतिवैभव—जातीचें (१४ + ५) =१९ मात्रांचें असतें; व अंतरा (५+८+८)=२१ मात्रांचा शारदा-जातीचा असतो. ( रामराज्यवियोगांतील खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे. )

नृपममता रामावरतीं—
प्राणाहुनि बहु आहे ती, कसें करूं?
सिंहासन ज्येष्ठा-हातीं,—
ऐशीं तीं शास्त्रें रडतीं, कसें करूं?
निर्दया,
नव्हे कैकया,
राघवीं दया,
अमित ती करिती—
तशि नाहीं अपुल्या भरतीं, कसें करूं? ॥ १ ॥

## ७. गुणी ( मात्रा ६ व १४ )

यांत चरणाच्या आरंभींचा भाग ६ मात्रांचा असून, पुढें उद्धवजातीच्या १४ मात्रा असतात. अंतरा ८ मात्रांच्या तीन ओळींचा असतो.

बाळ कुणी—संध्याकाळीं रमे गुणी ।
खेळतसे—बाळ अंगणीं हवें तसें ।
बागेंत—मौजेनें झोंके घेत ।
तों दिसली—सुंदरशी त्याला वेली ।
देठ कोवळे,
हिरवे पिवळे,
नाजुक सगळे,
ती वेली—हिरवा शालू पांघरली ॥ ( गडकरी )

## ८. फुलारीण ( मात्रा २४ व २६ )

यांत प्रथम चरणाचा पूर्वार्ध मात्र चंद्रकांतापेक्षां आरंभींच दोन मात्रांनीं कमी (१०+१४) मात्रांचा असतो; व द्वितीय चरण चंद्रकांताप्रमाणेंच २६ मात्रांचा असतो.

माया जळली का ?—तिळही ममता नाहीं का ?
आली पोटीं पोर पकटी, तीही विकितां का ? ॥१॥
लाजहि गेली का ?—मतिला भ्रमही पडला का ?
शोभा करितिल लोक तयाची, चाडहि नाहीं का ? (शारदा)

## ९. माळीण ( मात्रा २४ व २८ )

यांत ‘ फुलारीण’प्रमाणेंच चंद्रकांतापेक्षां आरंभींच दोन मात्रांनीं कमी एवढा म्हणजे (१०+१४)=२४ मात्रांचा प्रथम चरण असून, दुसरा चरण चंद्रकांतापेक्षां आरंभींच २ मात्रांनीं ज्यास्त (१८ + १०)=२८ मात्रांचा असतो. मंजरीचा (१६ + ५)=२१ मात्रांचा अंतरा असतो.

प्रियकर हिंदिस्तान्—अमुचा प्रियकर हिंदिस्तान् ।
हा अलंकार हो भूगोलाचा, यास नसे उपमान् ॥
हे जन्मभूमि, हें तन-मन-धन घे तुला ।
तव उपकारांना, न मिळे कोठें तुला ।
हें फिटणें साध्य न, आम्हां अति-दुर्बलां ।
सुखकर तव गे ध्यान्—निरंतर सुखकर तव गे ध्यान् ॥
जो जननीचा जो जनकाचा गे, तोच तुझाही मान् ( टिळक )

## १०. शशिकान्ति ( मात्रा १२ व १८ )

यांत साकींतील १२ मात्रांचा प्रथम भाग असून, दुसऱ्या भागांत १८ मात्रा असतात. ( मृच्छकटिकांतील खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे. )

अवचित या मेघांनीं—
शशिकान्ति चोरिली संधि साधुनी ॥ ध्रु० ॥
मालक निर्बल पाहुनि—
न्यावें तयाचें धन बहूतांनीं ॥
तैसें या मेघांनीं—
शशिकान्ति चोरिली संधि साधुनी ॥ १ ॥

## ११. गोविन्द ( मात्रा २५ व २६ )

यांत ध्रुवपद (१०+१५) मात्रांचें असून, कडवें चंद्रकांतजातीचें २६ मात्रांचें असतें.

क्षुधित वनीं गोविन्द—बाइगे, क्षुधित वनीं गोविन्द् ॥ ध्रु०॥
रवि-तनया-तटिं शिशूंसह हा व्रज चारित गोधन-वृन्द् ॥ १ ॥

## १२. कोकिळा ( मात्रा २६ )

यांत चंद्रकांताप्रमाणे २६ मात्रांचें ध्रुवपद असून, अंतऱ्यांत पादाकुलकाच्या (८ + ८) =१६ मात्राच्या तीन ओळी असतात. ध्रुवपदांतील व चरणांतील अन्त्याक्षर निभृत उच्चाराचें व्यंजन असतें.

**अवेळ तरिही बोल, कोकिळे अवेळ तरिही बोल् ॥ ध्रु०॥**
**रात्र पसरली, जगतावरतीं।**
**भुरके काळे, मेघहि फिरती।**
**वारा वाहे, भरभर भंवतीं।**
**बालचंद्र-चंद्रिका घाबरीं गोरीं मोरीं होत् ॥ १ ॥** ( गडकरी )

## १३. मनी ( मात्रा २६ किंवा २७ )

यांत चंद्रकांत-जातीप्रमाणें ध्रुवपदांत व चरणांत २६ किंवा क्वचित् २७ मात्रा असतात; आणि पादाकुलकाच्या (८ + ८)=१६ मात्रांच्या दोन किंवा तीन पंक्ति अंतऱ्यामध्यें असतात. ( खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे. )

**गुणी आणि अवगुणी—अशी ही द्वाड आमुची मनी ॥ ध्रु० ॥**
**जशी काय ही, बाई कोणी।**
**आली बर्फाच्या देशांतुनि।**
**अंगाला कापूस डकवुनी।**
**मऊ रेशमाहुनी-अशी ही द्वाड आमुची मनी ॥ १ ॥** ( अना० )

## १४. चिमणी ( मात्रा २६ किंवा २७ )

कोकिळेप्रमाणेंच ही जाति असून, कोकिळेंतील चरणांत शेवटीं निभृत व्यंजन असतें, तें यांत नसतें, एवढाच फरक. अंतराही पादाकुलकाचा (८+८)=१६ मात्रांचाच असतो. ( गडकऱ्यांच्या खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे.)

**नकोत चिमण्या राघू—घुबडा, बोऽल रे घूं घूं ॥ ध्रु० ॥**
**मातित मिसळुन, गेली माती।**
**धडपड असल्या, फोलासाठीं।**
**चिव चिव नुसत्या, पोटासाठीं।**
**ओंवाळुन टाकिलें जगाला—मी तूं कधिंहि न मागूं ॥ १ ॥**

## १५. प्रणयप्रभा ( मात्रा १६ व शेवटचा चरण १४ )

हें वृत्त हल्लीं ज्यास्त प्रचारांत येऊं लागलें आहे. त्यांत पादाकुलकाच्या १६ मात्रांच्या कांहीं पंक्ति असून, शेवटची ओळ केंव्हां केंव्हां बालानंदाची १४ मात्रांची असते. अंतराही पादाकुलकाचाच असतो.

**घन तमीं शुक्र बघ राज्य करी।**
**रे खिन्न मना ! बघ जरा तरी ॥ ध्रु० ॥**
**ये बाहेरी, अंडें फोडुनि ।**
**शुद्ध मोकळ्या, वातावरणीं ।**
**कां गुद्मरसी, आंतच कुढुनी ।**
**मार भरारी जरा वरी ॥ घन० ॥** ( ताम्बे )

## १६. शूर्पणखा ( मात्रा २७ व २९)

यांत चंद्रकांताप्रमाणेंच पण २७ मात्रांचें ध्रुवपद असून, मेळांत प्रारंभींच दोन मात्रा अधिक म्हणजे एकंदर २९ मात्रा असतात. अंतरा चंद्रकला-जातीचा १३।१३ मात्रांच्या दोन किंवा तीन ओळींचा असतो. ( गिरीशांच्या खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे.)

**गेलें तुझ्यावर जडून्—रामा, मन गेलें तुझ्यावर जडून् ॥ ध्रु०॥**
**किति नटून् सजून् मी आल्यें ।**
**किति अलंकार हे ल्यालें ।**
**किति नाजुक गेलें बाइ होउन्—**
**रामा, मन गेलें तुझ्यावर जडून् ॥ १ ॥**

## १७. मुरली (मात्रा १४ व २८)

यांत आरंभींच उद्धव-जातीच्या अंतऱ्याप्रमाणें १४।१४ मात्रांच्या तीन ओळी असून, शेवटचा चरण चंद्रकांत-जातीचा पण प्रथम दोन मात्रा अधिक असलेला ( २ + २६ ) =२८ मात्रांचा असतो. ( गडकऱ्यांच्या खालील प्रसिद्ध पद्यावरून हें नांव पडलें आहे. )

मी अगदीं भोळी राधा ।
तूं माधवजी नच साधा ।
मोहनी करी सुख-बाधा ।
तुज, दासी विनवुन झुरलि कनय्या बजाव् बजाव् मुरली ॥१॥
ही एक आस मनिं उरलि कनय्या बजाव् बजाव् मुरली ॥२॥

## १८. अभिसारिका ( मात्रा १६ व २२ )

साकींतील १६ मात्रांचें प्रथमार्ध याप्रमाणें पहिले दोन चरण व भूपतिवैभवाचे २२ मात्रांचे पुढील दोन चरण यांमिळून हें वृत्त होतें. ( रामराज्यवियोगांतील खालील पद्यावरून हें नांव पडलें आहे.)

सुटला पितृ-दिशेचा वारा ।
झांकी मेघ नभःपथ सारा ।
घन गर्जति तोफेपरी वर्षती गारा ।
कडकडाट करिती विजा येति जल-धारा ॥ १ ॥

## १९. भरत (मात्रा २४ व १४)

यांत ध्रुवपद १४ मात्रांचा एक गट व १० मात्रांचा दुसरा गट याप्रमाणें २४ मात्रांचें असतें. अंतऱ्यामध्यें १४ मात्रांचे तीन चरण असून, शेवटचा चरण त्याप्रमाणेंच पण ध्रुवपदाच्या यमकाशीं जुळणारा १४ मात्रांचा असतो. ( " माझा भरत देखिला काय ? " या प्रेमाबाईच्या प्रसिद्ध पद्यावरून हें नांव पडलें आहे. )

माझ्या बाळावरतीं रोष्—कैकइ धरिशी कां ? ॥ ध्रु० ॥
अंतरल्यावर श्रीरघुराज् ।
माझे प्राणचि जातिल आज् ।
त्रिभुवनिं अपकीर्तीची लाज् ।
व्यर्थचि आऽज करिशी कां ? ॥ १ ॥ (जीवनतनय)

## २०. मनमोहन ( मात्रा २८ व १४ )

ध्रुवपद असल्यास ( २ + २६ ) याप्रमाणें चंद्रकांत-जातीच्या आरंभींच दोन मात्रा अधिक असलेलें असें असतें; आणि ७।७ मात्रांच्या दोन गटांचा एकेक

चरण असे दोन चरण त्यापुढें असून, शेवटीं मेळही ध्रुवपदाच्या चरणाप्रमाणेंच असतो.

**मन-मोहन वाजवुनी सारंगी काढी मंजुळ सूर् ॥ ध्रु० ॥**
**विश्व निजलें । शान्त झालें ।**
**एक धरणी । मात्र डोले ।**
**गंभीरपणानें अंधारांतुन छेडित जाई सूर् ॥ १ ॥** (श०)

## २१. मुद्रिका ( मात्रा २१ आणि १४ व १३ )

यांत मंजरीचा २१ मात्रांचा पहिला चरण आणि नंतर उद्धवाच्या १४ मात्रांस जोडूनच पुढें १३ मात्रांचा एक भाग असतो. ( " मुद्रिके, राम टाकुन आलिस तूं कशी ? " या पद्यावरून हें नांव पडलें आहे. )

**भंगिलं शिवधनुष्य रामें वरिलें मला ।**
**वनिं आलों उभयतां बाई—**
**कांचनें मृग देखिला ॥ १ ॥**

## २२. अभिमन्यु ( मात्रा १९ व १५ )

**चौघडा झडतो, झडतो दुमदुमुनी ।**
**धडधडे उर हें, कां म्हणुनी ? ॥** ( तांबे )

कवि आपल्या इच्छेप्रमाणें अनेक तऱ्हांचीं चरण-युग्मकें, अंतरे, ध्रुवपदें, वगैरे जुळवून कविता करितात; त्यामुळें जाति-वृत्तांचे प्रकार व उपप्रकार किती तरी होऊं शकतील. येथें फक्त प्रचलित व अत्यन्त प्रसिद्ध काव्यांचेंच स्थूलमानानें वर्गीकरण करून, त्यांचीं जाति-वृत्तें सांगितलीं आहेत. सध्यांचा काल कविता म्हणून दाखविण्याचा असल्यामुळें व सुंदर रीतीनें गाइलेल्या कवितांचा स्वर-माधुर्य व शब्द-मार्दव यांच्या योगानें घरोघरीं फैलाव होत असल्यामुळें, ह्या जाति-वृत्तांसंबंधीं वरच्या इतपत तरी ढोबळ माहिती असणें जरूर आहे; म्हणून ती येथें दिली आहे. कवि आणखी जे सुन्दर प्रकार निर्माण करितील त्यांची शास्त्रशुद्ध छाननी उत्तरोत्तर होत राहीलच.

———

## परकीय वाङ्मयांतून आलेलीं वृत्तें

ह्यांशिवाय मराठींत **गझल** व **सुनीत** हे दोन प्रकार आणखी जोरानें हल्लीं प्रसृत होऊं लागले आहेत; त्यांची ढोबळ माहिती खालीलप्रमाणें—

### गज्जल किंवा रसना

हें मूळचें अरबी वृत्त असून, त्याचा ' घझल ' असा उच्चार आहे. यांतील चरणांच्या जोड्या पांचांहून कमी व सातांहून ज्यास्त नसाव्यात. तसेंच सर्व जोड्यांतील समचरण एक-यमकीच असावेत. आरंभींचें चरणयुग्म ध्रुवपदादाखल उपयोगी पडतें. आरंभीं हें वृत्त मोरोपंतानें प्रचारांत आणिलें; त्या पद्यावरून ह्यास '**रसना**' हें नांव प्रो० माधवराव पटवर्धन ह्यांनीं दिलें आहे. त्यांच्या ' गज्जलांजलींत ' गज्जलाचे पुष्कळच भेदोपभेद दिले आहेत.

**रसने न राघवाच्या । थोडी यशांत गोडी ॥ ध्रु०॥**
**निंदा स्तुती जनांच्या । वार्ता वधू-धनाच्या ॥**
**खोट्या व्यथा मनाच्या । कांहीं न यांत जोडी ॥ १ ॥**
**साधूचिया सदातें । सुख देतसे सदा ते ॥**
**श्रवणीं सुधा, मदातें । सोडोनि, हात जोडी ॥२॥** ( मोरो० )

आनंदराव टेकाड्यांचें " **आनंद-कंद ऐसा०** " हें सुप्रसिद्ध राष्ट्रगीत याच वृत्तांतील आहे. ( वरील दोन्ही ठिकाणीं ध्रुवपदाच्या दोन ओळी नाहींत. )

### सुनीत

इंग्रजींतील (Sonet) '**सॉनेट**' च्या धर्तीवर मराठींत आलेला हा पद्य-प्रकार आहे. यांत वृत्त अमुकच असावें असा नियम नसून, ओळी मात्र १४ च पाहिजेत. भावगीतें साधारणतः या वृत्तांत रचिलेलीं आढळतात. यांतील यमकादिकांच्या माधुर्यामुळें याचा वीणा-काव्यांत समावेश करितात. प्रत्येक श्लोकांतील पहिली व चौथी ओळ यांचें व दुसरी-तिसरी या ओळींचें यमक साधलेलें असतें.

**" आम्ही कोण म्हणून काय पुससी? आम्ही असूं लाडके—**
**देवाचे दिधलें असे जग तयें आम्हांस खेळावया;**
**विश्वीं या प्रतिभा-बलें विचरतों चोहींकडे लीलया,**
**दिक्कालांतुनि आरपार अमुची दृष्टी पहाया शके!"**

सारेही बडिवार येथिल पहा आम्हांपुढें ते फिके
पाणिस्पर्शच आमुचा शकतसे वस्तूंप्रती द्यावया
सौंदर्यातिशया, अशी वसतसे जादू करांमाजि या
फोलें पाखडितां तुम्ही, निवडितों तें सत्त्व आम्ही निके
शून्यामाजि वसाहती वसविल्या कोणीं सुरांच्या वरें ?
पृथ्वीला सुरलोकसाम्य झटती घालावया कोण ते ?
ते आम्हीच सुधा कृतीमधुनियां ज्यांच्या सदा पाझरे
ते आम्हीच शरण्य, मंगल तुम्हां ज्यांपासुनी लाधतें
आम्हांला वगळा गतप्रभ झणीं होतील तारांगणें !
आम्हांला वगळा विकेल कवडीमोलावरी हें जिणें ! (केशवसुत)

दोहा ( मात्रा २४ )

यांतील चरणांत १ व ३ हे आठ मात्रांचे गट असून, दुसरा गट ६ मात्रांचा असतो; पण त्यांतील अन्त्याक्षराचें उच्चारण दोन मात्रांनीं वाढवून तो गट पूर्ण ८ मात्रांचा करितात. चरणाच्या शेवटीं उपान्त्य अक्षर गुरु असून, अन्त्याक्षर निभृत उच्चाराचें व्यंजन असतें. याचा षण्मात्रिक जातिवृत्तांत समावेश होईल.

श्रीरामाच्या । भक्त-जनींऽऽ । हंसच जणुं बग । ळयांत् ॥
त्याच्या तुलसी- । दास तोऽऽऽ । नांदो हार ग- । ळयांत् ॥

# व्यु त्प त्ति

## शब्द–घटना

मराठीमध्यें विशेषेंकरून **संस्कृत, देशी, अरबी, फारसी,** ह्या भाषांचे शब्द आढळतात; आणि **हिंदी, गुजराती, तेलगू, कानडी** व **इंग्रजी** ह्या भाषांचे शब्दही बरेच आलेले आहेत. मराठी भाषा संस्कृतोत्पन्न असल्यामुळें व संस्कृतांत नवीन शब्द बनविण्याला उपसर्ग, प्रत्यय, धातु व समास यांमुळें फारच मदत होत असल्यामुळें, त्यांयोगें संस्कृत शब्द बनतात. अशा प्रकारें बनलेले पुष्कळच संस्कृत शब्द मराठींत जसेच्या तसे कांहीं फरक न होतां टिकून राहिले आहेत; आणि तसे शब्द ठेवण्याची मराठीची प्रवृत्तिही अजून जोरांत आहे. अशा संस्कृतांतून मराठींत येऊन जसेच्या तसे भाषेंत टिकून राहिलेल्या संस्कृत शब्दांना " **तत्सम** " शब्द असें म्हणतात. उदा०—देव, माता, पिता, कवि, रवि, गुरु, शत्रु, मित्र, इ०.

जे शब्द संस्कृत शब्दांच्या मूळ रूपांत फरक होऊन मराठींत आलेले आहेत, त्यांस " **तद्भव** " शब्द असें म्हणतात. उदा०—घर ( गृह ), हात ( हस्त ), पाय ( पाद ), कान ( कर्ण ), पान ( पर्ण ), कांटा ( कंटक ), इ०.

मराठींत असे कांहीं शब्द आहेत कीं, ते तत्सम, तद्भव, यवनी, वगैरे नसून कोठून उत्पन्न झाले असावे, हें कांहींच सांगतां येत नाहीं; ते मूळचेच येथल्या पूर्वीच्या महाराष्ट्रांत वसती करून राहिलेल्या लोकांचे असावे आणि ते आपल्या मराठींत दृढमूल झाले असावे, असें दिसतें; अशा शब्दांना " **देशी** " शब्द असें म्हणतात. उदा०—झाड, धाकटा, लेकरूं, इ०.

[ **टीप**—मराठी, गुजराती, हिंदी, बंगाली, इ० देशांत सध्यां चालू असलेल्या भाषांनाही **देशी भाषा** किंवा **देशभाषा** असें म्हणतात; पण त्या अर्थानें येथें देशी हा शब्द वापरला नसून, महाराष्ट्रांत मूळ राहणाऱ्या लोकांचे जे शब्द मराठींत जसेच्या तसे शिल्लक उरले आहेत, ते 'देशी' शब्द; ह्या अर्थानेंच **हेमचंद्र** वगैरे पूर्व-व्याकरणकार तो शब्द वापरितात, तसा येथें वापरिला आहे.]

जे शब्द मराठींत येतात—ते तत्सम असोत, तद्भव असोत, देशी असोत, यवनी असोत, किंवा दुसऱ्या कांहीं सहचर भाषांतील असोत,—त्या शब्दांची साध-

निका काय, त्याचें पूर्वस्वरूप व सध्यांचें स्वरूप ह्यांत फरक कोणत्या प्रकारें व कोणत्या कारणानें झाला, त्यांचें कांहीं अर्थान्तर झालें कीं काय, तें कां झालें, इ० गोष्टींविषयीं आपल्या भाषेसंबंधीं स्थूल अभ्यास करणारांसही थोडी-फार माहिती असणें अवश्य आहे. तिच्या योगानें चिकित्सक-बुद्धि वाढते; पूर्वींचे समाज, त्यांच्या चालीरीति, इत्यादिकांवर प्रकाश पडतो; मानवी संस्कृतीचें पाऊल कसकसें पुढें पडत गेलें, त्याची कल्पना येते; आणि एकंदरींत ह्या गोष्टी पाहत असतां, कांहीं चमत्कारिक माहिती मिळून मनाला आनंदही होतो.

येथें प्रथम संस्कृत साधित शब्द, नंतर मराठी साधित शब्द आणि शेवटीं यवनी म्हणजे अरबी व फारसी भाषांतील व हिंदी, गुजराथी, कानडी, इतर मराठीच्या सहचर भाषांतील मराठींत आलेले शब्द, यांचा क्रमानें विचार करूं.

मराठींत येणारे बरेचसे संस्कृत शब्द जसेच्या तसे येतात, ते शब्द मूळ संस्कृत धातूंना केव्हां मागें **उपसर्ग** व केव्हां पुढें **प्रत्यय** लागून बनतात; व केव्हां दोन्ही लागून बनतात.

जीं अव्ययरूप अक्षरें धातूच्या मागें लागून, बरेच वेळां त्या धातूचा मूळचा अर्थ फिरवितात, त्यांस " **उपसर्ग** " असें म्हणतात. उदा०—'हृ' धातूचा मूळ अर्थ हरण करणें; परंतु आ-हार=खाणें, वि-हार=खेळणें, सं-हार=ठार मारणें, प्र-हार=तडाखा देणें. याप्रमाणें मागें लागलेल्या अक्षरांमुळें त्या धातूच्या अर्थांत बदल झाला आहे. असेंच इतर धातूंविषयीं समजावें.

कोणत्या उपसर्गामुळें कोणते अर्थ उत्पन्न होतात, ह्यांच्या समजुतीसाठीं ते उपसर्ग व त्यांनीं युक्त असे शब्द देतों.

## संस्कृत उपसर्ग

**अति**—( आधिक्य ) अतिशय, अतिरेक. ( पलीकडे ) अतिक्रम, अत्यन्त.

**अधि**—(मुख्य) अधिपति, अध्यक्ष. ( वर ) अध्ययन, अध्यापन.

**अनु**—(मागून) अनुक्रम, अनुताप, अनुज. (प्रमाणें) अनुकरण, अनुमोदन.

**अप**—(खालीं येणें) अपकर्ष, अपमान. ( विरुद्ध होणें ) अपकार, अपजय.

**अपि**—( आवरण ) अपिधान=आच्छादन.

**अभि**—(अधिक) अभिनंदन, अभिलाष. (जवळ) अभिमुख, अभिनय. (पुढें) अभ्युत्थान, अभ्युदय.

**अव**—( खालीं ) अवगणना, अवतरण. ( अभाव ) अवकृपा, अवगुण.

**आ**—( पासून, पर्यंत ) आकंठ, आजन्म. ( किंचित् ) आरक्त. ( उलट ) आगमन, आदान. ( पलीकडे ) आक्रमण, आकलन.

**उत्**—( वर ) उत्कर्ष, उत्तीर्ण, उद्भिज्ज

**उप**—( जवळ ) उपाध्यक्ष, उपदिशा. (गौणत्व) उपग्रह, उपवेद, उपनेत्र.

**दुर्, दुस्**—( वाईट ) दुराशा, दुरुक्ति, दुश्चिन्ह, दुष्कर.

**नि**—( अत्यन्त ) निमग्न, निबन्ध. म०—(हीनत्व) निकामी, निजोर.

**निर्, निस्**—( अभाव ) निरंजन, निराश, निष्फळ, निःशेष, निश्चल.

**परा**—(उलट) पराजय, पराभव.

**परि**—( पूर्ण ) परिपाक, परिपूर्ण. (व्याप्त) परिमित, परिश्रम, परिवार

**प्र**—(आधिक्य) प्रकोप, प्रबल, प्रपिता

**प्रति**—( उलट ) प्रतिकूल, प्रतिच्छाया. ( एकेक ) प्रतिदिन, प्रतिवर्ष, प्रत्येक.

**वि**—( विशेष ) विख्यात, विनंति, विवाद. (अभाव) विकल, विधवा, विसंगति.

**सम्**—( चांगलें ) संस्कृत, संस्कार, संगीत. ( बरोबर ) संगम, संयोग, संकीर्ण.

**सु**—( चांगलें ) सुभाषित, सुकृत, सुग्रास. ( सोपें ) सुगम, सुकर, स्वल्प. ( आधिक ) सुशोभित, सुशिक्षित.

**टीप**—एकाच शब्दांत केव्हां केव्हां दोन-दोन, तीन-तीन, उपसर्गही आढळतात. उदा०--( प्रति+अप+वाद )=प्रत्यपवाद, ( सम्+आ+लोचन )=समालोचन, ( वि+आ+करण )=व्याकरण; अत्युत्कृष्ट, निर्विकार, सुसंगति, इ०.

## मराठी उपसर्ग

संस्कृतांत उपसर्ग धातूंच्याच मागें लागतात, पण मराठींत अशा प्रकारें उपयोगांत आलेले कांहीं विशेषणरूप व अव्ययरूप शब्द धातूंशिवाय इतर शब्दांच्याही मागें येतात; त्यांस मराठी उपसर्ग असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**अ**–अजाण, अडाणी, अमोल, असडीक

**अड**–अडसर, अडमुठ्या, अडसांधे.

**आड**–आडवाट, आडनांव, आडकाठी.

**अद्**–अदपाव, अदशेर, अदमुरें, अदमण

**अव**–अवजड, अवघड, अवलक्षण

**दु**–दुकाळ, दुवेत

**नि**–निकामी, निजोरी, निढळ, निकोप, निधड्या, निलाजरा.

**निर्, निस्**–निर्फळ, निर्गांठ, निर्धोक, निर्धास्त, निष्काळजी.

**पड**–पडजीभ, पडसाद, पडछाया

## यवनी उपसर्ग

**ऐन**–ऐनखर्च, ऐनजिन्नस, ऐनहंगाम

**गैर**–गैरहजर, गैरसमज, गैरवाजवी

**ना**–नाउमेद, नापसंत, नादार, नाहक, नालायक, नामंजूर.

**ब**–बजिन्नस, बदस्तुर, बइस्म (बेशर्मी)

**बिन**–बिनदिक्कत, बिनतकरार; बिनधोक, बिनहरकत.

**बिला, बेला**–बिलाकसूर, बेलाशक

**कम**–कमजोर, कमकूवत, कमबख्त

**दर**–दररोज, दरमहा, दरकूच, दरसाल, दरमजल.

**बद**–बदलौकिक (म०–बद्द),बदफैली

**बर**–बरहुकम, बरहक्क, बरतर्फ, बरदास्त

**बे**–बेअब्रू, बेअदबी, बेइमान, बेदम

**हर**–हररोज, हरवख्त, हरघडी

[**टीप**—इंग्रजींतूनही सब-जज, सब-इन्स्पेक्टर, सब-पोस्ट, अशा प्रकारें मराठींत 'सब' यासारखे कांहीं शब्द उपसर्गांप्रमाणें उपयोगांत येऊन मराठींत आले आहेत.]

## संस्कृत प्रत्ययघटित शब्द

### संस्कृत धातुसाधित नामें

विविधार्थक

पुल्लिंगी

**अ**—त्याग ( त्यज्+अ ), भाग ( भज्+अ ), पाक ( पच्+अ ), काम, भाव ( भू+अ ), सार, स्तव, वर, भव, मद, लक्ष, इ०. आहार ( आ+हृ+अ ), संचय ( सम्+चि+अ ), विश्राम ( वि+श्रम+अ ).

स्त्रीलिंगी

**आ**—इच्छा ( इष्+आ ), कथा ( कथ्+आ ), जरा ( जॄ+आ ), चिंता, शिक्षा, पूजा, गुहा, पीडा.

**अना**—प्रार्थना ( प्र+अर्थ्+अना ), वेदना, कल्पना, वंदना, तुलना.

**ति**—कृति (कृ+ति), स्मृति, नीति, शक्ति, भीति, युक्ति ( युज्+ति ), दृष्टि, इ०.

[कांहीं 'म्' कारान्त व 'न्' कारान्त धातूंस हा प्रत्यय लागतांना अन्त्य म् व न् याचा लोप होतो. उदा०— मति (मन्+ति), रति (रम्+ति), गति (गम्+ति). बुद्धि ( बुध्+ति ), शुद्धि ( शुध्+ति ), यांत ध् बद्दल द् होतो व ति–बद्दल धि असें होतें ].

**या**-विद्या, चर्या, क्रिया, शय्या (शी + या), इ०.

नपुंसकलिंगी

**अन**-स्थान, दान, मान, पान, उत्थान (उत्+स्था+अन), संपादन

**अस्**-सरस् (सृ+अस्), वचस्, तमस्, वयस्, (वय्-जाणें).

**उस्**-चक्षुस् (चक्ष्+उस्), यजुस्, आयुस् (इ+उस्), धनुस्.

[ यांतील विसर्गाचा लोप होऊन मराठींत वच, तम, वय, चक्षु, तेज, ऊर, यश, अशीं रूपें होतात. ]

**मन्**-नामन्, धामन्, चर्मन्, ब्रह्मन्, इ०. [ मराठींत याचीं नाम, धाम, चर्म, ब्रह्म, अशीं नपुंसकलिंगी रूपें होतात. ]

कर्त्रर्थक

**अ-चोर** (चुर्+अ, चोरणारा); सर्प (सृप्+अ, सरपटणारा); देव (दिव्+अ, प्रकाशणारा).

[ ग्रंथकार, चर्मकार, सुवर्णकार, हींही अशा प्रकारचींच कर्तृवाचक नामें आहेत. तसेंच प्रियंवदा (प्रिय+वद्+आ), वसुंधरा, हेही आकारान्त स्त्रीलिंगी कर्तृवाचक शब्द अशाच प्रकारें साधले आहेत. यांतील शेवटचे शब्द कार, वद व धर हे कर्तृवाचक धातुसाधितें असून ते मागील शब्दांना जोडले आहेत. ]

**अक**-पावक (पू+अक, पवित्र करणारा, अग्नि), लेखक, नर्तक, रजक, जनक, इ०.

**अन**-नंदन (नंद्+अन, आनंद देणारा, पुत्र), मदन, रमण, रावण

**इ**-हरि (हृ+इ, हरण करणारा).

**तृ**-भर्ता (भृ+तृ), वक्ता, स्रष्टा (सृज्+ता), योद्धा, [ यांतील 'तृचें' प्रथमेचें एकवचनी **ता** असें रूप होतें ].

[ जन्, गम्, इ० कांहीं धातूंमधील अन्त्य व्यंजनाचा लोप होऊनही, कांहीं कर्तृवाचक नामें साधतात. उदा०-द्विज (द्वि+जन्, दोनदां जन्मणारा, ब्राह्मण, पक्षी), पंकज, अनुज, नग, उरग, विहंगम, दुर्ग, इ० ].

साधनार्थक

**अन**-नयन (नी+अन, नेण्याचें साधन, डोळे), चरण, वदन.

**त्र**-नेत्र (नी+त्र, नेण्याचें साधन डोळा), पात्र, श्रोत्र, **शस्त्र** (शस्-मारणें).

## संस्कृत धातुसाधित विशेषणें.

### कर्तृवाचक

**अ**–भयंकर ( भय+कृ+अ, भय करणारें), यशस्कर, प्रियकर, पापघ्न.

**अक**–पाचक, दायक, तारक, मारक, हारक, घातक, नायक ( नी+अक ), निंदक, इ०.

**इक**–रसिक, ( रस घेणारा ), पथिक, ( पथ चालणारा ), इ०.

**तृ**–दाता, भोक्ता, श्रोता, भेत्ता ( भिद्+तृ ), द्वेष्टा ( द्विष्+तृ ), नियंता.

**इतृ**–शासिता ( शास्–शिकविणें ), भविता ( भू-होणें ), कामिता, सहिता, इ०.

**इन्**–त्यागी ( त्यज्+इन् ), दोषी, द्वेषी, विभागी ( वि+भज्+इन् ), योगी, ( युज्+इन् ), इ०.

**इष्णु**–सहिष्णु ( सह्+इष्णु, सहन करणारा ), जिष्णु ( जिंकणारा ), वर्धिष्णु ( वाढणारा ), इ०.

**नु**–विष्णु (विश्–शिरणें, शिरणारा), स्थाणु ( राहणारा ), इ०.

### भूतकालवाचक

**त**–भूत ( झालेलें ), कृत, मृत, नीत, च्युत ( पडलेलें ), ख्यात, त्यक्त ( टाकलेलें ).

[ कांहीं 'म्'कारान्त व 'न्'कारान्त धातूंमधील अन्त्य व्यंजनाचा लोप होतो. उदा०–मत ( मन्+त ), जात ( जन्+त ), हत, नत, गत, रत, इ० ] .

[ 'ह' पुढें त आल्यास केंव्हां केंव्हां त्या दोहोंमिळून **ढ** होतो. उदा०–मूढ ( मुह्+त ), गूढ ( गुह्+त, विचारार्ह ), रूढ, इ०. ]

[ कांहीं ठिकाणीं 'त' बद्दल **न** किंवा **ण**, येतात. उदा०—कीर्ण ( कॄ+ण ), जीर्ण ( जॄ+ण ), विदीर्ण ( दॄ+ण ); हीन ( हा+न ), लीन, क, व, ल, हीं अक्षरेंही 'त' बद्दल अनुक्रमें शुष्क, पक्व, फुल्ल, ह्या शब्दांतच येतात. ]

**इत**–मोदित ( मुद्+इत ), उदित ( वद्–बोलणें ), कथित, विदित, पूरित, इ०.

### योग्यार्थक

**य**–कार्य (करण्यास योग्य), त्याज्य, पेय, देय, भोज्य, भोग्य, इ०.

**तव्य**–कर्तव्य, भेत्तव्य, नेतव्य, श्रोतव्य, दातव्य, गंतव्य ( गम्+तव्य ), इ०.

**इतव्य**–भवितव्य ( भू+इतव्य ).

**अनीय**-वंदनीय, करणीय, श्रवणीय, चिंतनीय, मननीय, पूजनीय, रमणीय, इ०.

## आणखी कांहीं संस्कृत धातुसाधितें

**उ**-वायु, स्वादु ( स्वद् ), साधु, बाहु ( वह्-नेणें ), मरु ( मृ-मरणें ), तरु ( तॄ-तरणें ), इ० ).

**उर**-चतुर, अंकुर, भंगुर

**इर**-मंदिर, रुधिर, रुचिर

**इल**-सलिल, अनिल, कुटिल, महिला ( मह्-वाढणें )

**म**-क्षेम, पद्म, धर्म, होम, युग्म.

**र**-चक्र, शक्र, क्षुद्र, चंद्र, छिद्र, शुभ्र, आर्द्र, रुद्र, शूद्र, मुद्रा.

## संस्कृत शब्दसाधितें

### अपत्यार्थक

**अ**-पार्थ, सौभद्र, पांडव, यादव, भार्गव, वासिष्ठ, सौमित्र.

**इ**-दाशरथि, मारुति, वैराटि, कार्ष्णि

**एय**-गांगेय, कार्ष्णेय, राधेय, वैनतेय

**य**-पाराशर्य, गार्ग्य, दैत्य, याज्ञवल्क्य

### संबंधार्थक

**अ**-सारस ( सरस् म्ह० तळें या-संबंधीं ), चांद्र, सौर, नाक्षत्र, शारीर, शैव, वैष्णव.

**इक**-कायिक, वाचिक, मानसिक.

**इय**-यज्ञिय, राष्ट्रिय, श्रोत्रिय ( श्रुतीसंबंधीं ).

**ईय**-त्वदीय, मदीय, अस्मदीय, युष्मदीय, तदीय, यदीय.

**कीय**-स्वकीय, परकीय, राजकीय

**य**-तालव्य, दन्त्य, वायव्य, सौम्य.

### भावार्थक

**अ**-गौरव ( गुरु+अ, गुरुपणा ), लाघव, यौवन, मौन (मुनिपणा)

**इमन्**-गरिमा (गुरु+इमन्), लघिमा, कालिमा, महिमा, रक्तिमा.

**ता**-मृदुता, कठोरता, शालीनता.

**त्व**-शत्रुत्व, मित्रत्व, आप्तत्व.

**य**-सौंदर्य, माधुर्य, चातुर्य, क्रौर्य.

### युक्तार्थक

**मत्**-श्रीमान् ( श्री ज्यापाशीं आहे तो ), बुद्धिमान्, धीमान्; स्त्री०-श्रीमती, बुद्धिमती.

**वत्**-गुणवान्, धनवान्, विद्यावान्, ज्ञानवान्; स्त्री०-गुणवती, रूपवती.

**इन्**-दन्तिन् (दांत आहेत ज्याला तो, हत्ती), हस्तिन्, करिन्, धनिन्, अर्थिन्; स्त्री०-कमलिनी, कुमुदिनी.

**विन्**-तेजस्विन्, मनस्विन्, मायाविन्, यशस्विन्; स्त्री०-पयस्विनी.

### आधिक्यार्थक

**तर**-लघुतर, गुरुतर, महत्तर, श्रेष्ठतर,

**तम**-लघुतम ( सर्वांत लहान ), उत्तम ( सर्वांत चांगला ). महत्तम ( सर्वांत मोठा ).

पूर्णत्वार्थक

**मय**–आनंदमय, जलमय, सुवर्णमय, काष्ठमय, मृण्मय, मांसमय

स्वार्थक

**क**–बालक ( बाल ), दीपक (दीप)

## आणखी कांहीं संस्कृत शब्दसाधितें

उपसर्गसदृशांनीं होणारीं

**अ**–(अभाव ) अन्याय, अधर्म, अनीति. ( भिन्नत्व ) असंख्यात, अगणित, अवर्णनीय

**कु-का**–कुकर्म, कुवासना, कापुरुष

**न**–नक्षत्र, नास्तिक, नपुंसक, नग

**स**–(सहित) सजीव, सकाम, सशास्त्र

**सह**– (बरोबर) सहवास, सहगमन, सहचर, सहगमन, सहानुभूति

प्रत्ययसदृशांनीं होणारीं

**अन्तर**–देशान्तर, ग्रामान्तर, रूपान्तर, भाषान्तर, अर्थान्तर

**अर्ह**–(योग्य) पूजार्ह, मानार्ह, दानार्ह, दण्डार्ह, विचारार्ह, स्वीकारार्ह.

**आढ्य**–बलाढ्य, गुणाढ्य, धनाढ्य, गर्वाढ्य, विद्याढ्य

**कर**—प्रभाकर, दिवाकर, दिनकर, सुखकर, दुःखकर, श्रेयस्कर.

**पर**–तत्पर, भक्तिपर, धर्मपर, नीतिपर

## मराठी साधित शब्द

### धातुसाधित नामें

क्रियावाचक

**अ**–कर, डर, लूट, फूट, मेळ, फेर, झोक, खोट

**आ**–वेढा, झगडा, ठेवा, ठेचा, भरडा

**आट**–चकचकाट, लखलखाट

**आंडी**–झुकांडी, चिळकांडी

**आळी**–डरकाळी, चिरकाळी

**आव**–चढाव, रिघाव, फैलाव, टिकाव

**ई**–उडी, बुडी, बोली, चोरी, उलटी

**ऊं**–हसूं, रडूं, गळूं

**एं**–हसें, रडें

**डा**–हंबरडा

**ण**–दळण, कांडण, वळण, लोळण

**णी**–लावणी, कापणी, मळणी, पेरणी

**णें**–बोलणें, करणें, जाणें, येणें

**त**–उगवत, मावळत

**ती**—गणती, फिरती, गळती, भरती

**तें**—दुभतें, भरतें

**प**—वाढप, काडप, वाटप

**रा**–विकरा, विकरी ( स्त्री० )

**व**—देव, घेव

**वा**—थकवा, बोलवा, रुसवा

### कर्तृवाचक

**आ**–ओढा ( ओढणारा ), झरा, झोला, झोका

**आरी**–पुजारी, पिंजारी

**ऊ**–भिडू (भिडणारा), झाडू, उतारू

**कर**–विणकर ( विणणारा )

**णा**–पाळणा (पाळणारा), अडणा, अडणारा, अडविणारा ).

**पी**–कांडपी, वाढपी

**वय्या**–गवय्या ( गा+वय्या ), बजवय्या ( बाज+वय्या ), लढवय्या ( लढ+वय्या ).

### भाववाचक

**आई**–खोदाई, उजळाई, चराई, घडाई.

**की**–फुशारकी, उनाडकी,

### साधनार्थक

**ई**–हातरी, थापी, खुरपी, कढई

**एं**–खुरपें, वल्हें, ढापें ( झांकण्याचें साधन)

**ण**,–चाळण, झांकण.

**णी**–झांकणी, चाळणी.

**णें**–लाटणें, कातणें, गाळणें

### स्थानार्थक

**ओसा**–आडोसा, पडोसा

**ण**–दडण, लवण, वाकण, **वळण**, चढण

**णी**–न्हाणी

### पूर्णक्रियादर्शक

**आ**–पसारा ( पसरलेला ), **चोंदा** तोटा, उमाळा

**आणूं**—उठाणूं ( उठलेलें ), **जिवाणूं** ( जीव असलेलें )

**टा**—कपटा ( कापलेला ), **चिरटा** ( चिरलेला )

**का**—फाळका (फाळलेला).

## धातुसाधित विशेषणें

### कर्तृवाचक

**आ**—लंगडा, लुला (लोळणारा).

**आऊ**–लढाऊ, शिकाऊ, दिखाऊ

**आडू**—खेळाडू

**आळू**–सोसाळू, विसराळू

**ईक**–खर्चीक, सोशीक, पढीक

**एल**–रंगेल, ( रंगणारा ), अडेल

**क**, **का**–मारक, शोधक; मारका, बोलका

**कट**–मारकट ( मारणारें )

**कर**–खेळकर, रुचकर

**खोर**–भांडखोर, चिडखोर, उधळखोर

**गा**–भांडगा, दांडगा

**टा**–चोरटा, भामटा ( भ्रमविणारा )

**डा**–वाकडा (वाक असणारा)

**णा**–देखणा (दिसणारा), राखणा

**णार**, **णारा**–जेवणार, खाणार, जेवणारा, खाणारा.

**ता, ती, तें**–देता, घेता; दुभती, खाती, पिती; रांगतें, बसतें

**या**–बश्या, उधळ्या, उचल्या

**रा**–चावरा, धावरा, हसरा, कापरा, दुखरा

**वा**–नटवा, रडवा

पूर्णक्रियादर्शक

**आ**–उघडा (उघडलेला), सुटा, सुका

**आवट**–बनावट, धुवट

**ई**–छापी, लेखी, मोडी (मोडलेलें)

**ईक**–सडीक, पडीक, पढीक

**ईत**–लखलखीत, चकचकीत

**ईर**–फुगीर, फुटीर

**ईव**–सोलीव, भरीव, कोरीव

**ईल**–छापील, डागीळ

**एं**–आदमुरें (अध मुरलेलें).

**क, का**–वेचक, निवडक; मोडका, फुटका

**ट, कट**–सुकट, कुजट; कुजकट, मळकट

**ला, ली, लें**–'गेला' माणूस, 'आली' वेळ, 'पिकलें' पान

**लेला**–'वाचलेला' ग्रंथ; 'लिहिलेली' पोथी; 'मेलेलें' वासरूं

योग्यार्थक, शक्यार्थक

**आऊ**–जळाऊ (जळण्यायोग्य), विकाऊ, टिकाऊ

**सर**–आटपसर, आवळसर

**एं**–पळीवाढें (पळीनें वाढण्यास योग्य), बोटचेपें

## धातुसाधित अव्ययें

**आं**–करकरां, ढळढळां, चरचरां, गरगरां ( यांना अनुकरणवाचक क्रि० वि० अव्ययें म्हणतात. )

**ऊं**–खाऊं, पिऊं, देऊं

**ऊन**–खाऊन, पिऊन, देऊन, घेऊन

**तां, तांना**–येतां, जातां; येतांना, जातांना

**ल्या**–उठल्या, बसल्या, पडल्या

( अ ) पूर्वकालवाचक–मी **जेवून** शाळेंत जातों, तो **पाहून** उदाहरणें लिहितो.

( आ ) वर्तमानक्रियावाचक––तो **बसून** असतो, तो **पडून** असतो.

( इ ) कारणवाचक–तो **खाऊन** ( खाण्यामुळें ) माजला, तो **गिळून** मस्त झाला.

( ई ) रीतिवाचक––**फिरून** यत्न करून पहा, खच्चून, दाटून, रगडून, इ०.

याप्रमाणें मराठींत धातुसाधित नामें, विशेषणें व अव्ययें साधतात. स्थलाभावामुळें एकून एक शब्द येथें देतां येणें शक्य नाहीं. ढोबळ कल्पना येण्यापुरती माहिती दिली आहे.

